चित्र–दर्शन–शिक्षण–माला

पुस्तक दुसरें

# सचित्र महाराष्ट्र

संपादकः—वासुदेव शिवराम तोरो, बी. ए.

डेप्युटी एज्युकेशनल इन्स्पेक्टर फॉर व्हिजुअल इन्स्ट्रक्शन, मुंबई इलाखा.

सन १९२८.

किंमत तीन रुपये.

# प्रस्तावना.

सुमारें पांच वर्षांपूर्वी "चित्रदर्शनशिक्षणमाला" गुंफण्याचे कामास सुरुवात होऊन "पश्चिम खानदेश जिल्ह्याचें सचित्र वर्णन" या नांवाचें या मालेचें पहिलें पुस्तक प्रसिद्ध करण्यांत आलें. त्या पुस्तकांत चित्रांच्या हाय्यानें जिल्ह्याची भौगोलिक, ऐतिहासिक, धार्मिक, पौराणिक, वगैरे माहिती नवीन सचित्र शिक्षणपद्धतीनें, ोप्या, मनोरंजक व परिणामकारक रीतीनें कशी देतां येते, हें दाखविण्याचा प्रयत्न करण्यांत आला. या अल्प यत्नास बरेंच यश येऊन ही सचित्र शिक्षणपद्धति गेल्या पांच वर्षांत बरीच लोकप्रिय झाल्याचें आढळून आल्यावरून, या मालेचें "सचित्र महाराष्ट्र" या नांवाचें हें दुसरें पुस्तक प्रसिद्ध करण्यांत येत आहे. पहिल्या पुस्तकाप्रमाणें या पुस्तकासही चांगला लोकाश्रय मिळून पूर्वी न मिळालेला राजाश्रयही मिळण्याचा सुयोग आल्यास या मालेचीं पुढील पुस्तकें प्रसिद्ध करण्यास आह्मांस बरीच मदत होईल.

हें पुस्तक लिहिण्याचे कामीं, धुळें येथील ट्रेनिंग कॉलेजांतील अध्यापक रा. गोपाळराव नित्सुरे, तेथील प्रॅक्टिसिंग स्कुलांतील शिक्षक रा. दामोदरपंत भाभे आणि मुंबई स्कूलकमिटीचे ताब्यांतील शिक्षक रा. केशवराव गोखले या त्रिवर्गांनीं आम्हांस बरीच मदत केली. त्याचप्रमाणें पुणें येथील ट्रेनिंग कॉलेजचे माजी प्रिन्सिपॉल रा. रा. कृष्णाजी गोविंद पुंडलिक यांनीं या पुस्तकाची हस्तलिखित प्रत फारच काळजीपूर्वक तपासून अनेक उपयुक्त सूचना केल्या, याबद्दल या सर्व सद्गृहस्थांचे आह्मी अत्यंत ऋणी आहों.

या पुस्तकांतील १५० छायाचित्रांपैकीं सुमारें १२० चित्रें आम्ही महाराष्ट्रांत फिरत असतां स्वतःच घेऊन तयार केलीं आहेत. बाकी राहिलेलीं चित्रें सरकारी शेतकीखातें, जंगलखातें, पुराणवस्तुसंरक्षकखातें, महाराष्ट्रांतील बऱ्याच कारखान्यांचे चालक, फोटोग्रॅफर्स्, आर्टिस्ट्स् व इतर मित्रमंडळी यांनीं तयार करून दिलीं, त्याबद्दल त्या सर्वांचे आम्ही कृतज्ञतापूर्वक आभार मानितों.

या पुस्तकांतील नकाशे मुंबई येथील प्रख्यात आर्टिस्ट व मेडॅलिस्ट रा. राजाराम दाजी पानवलकर यांनीं तयार केले असून, चित्रांचे हाफ्टोन ब्लॉक्स् मुंबई येथील प्रसिद्ध ब्लॉक मेकर्स मेसर्स नेरॉय व वागळे यांनीं तयार केले. पुस्तक छापण्याचें काम मनोरंजन छापखान्याचे मॅनेजर रा. दामोदर रघुनाथ मित्र यांनीं फार दक्षतेनें केलें, याबद्दल या सर्वांचे आम्ही फार आभारी आहों.

मुंबई.
रामनवमी, शके १८५०.

**वासुदेव शिवराम तोरो.**

# अनुक्रमणिका.

# भाग दुसरा.

## प्रसिद्ध ऐतिहासिक स्थळें.

## भाग तिसरा.

## मुख्य पवित्र स्थळें.




१ भूपृष्ठरचना.




१ भूपृष्ठरचना.


नद्या.
नर्मदा नदी
तापी नदी
पूर्णा नदी
जळगांव
धुळें
नाशिक
वैतरणा
मवरा न.
नगर
ठाणें
अलिबाग
नीरा नदी
सोलापूर
सातारा
रत्नागिरी

२ नद्या.

# नद्या.

महाराष्ट्रांतील तापी नदीखेरीज करून बाकी सर्व नद्यांचा उगम सह्याद्रींत झाला आहे. सह्याद्रीच्या पश्चिम बाजूवर उगम पावलेल्या नद्या समुद्रसान्निध्यामुळें व कोंकणांतील डोंगराळ प्रदेशांतून वाहत गेल्यामुळें लहान, अरुंद व जोरानें वाहणाऱ्या आहेत. त्यांच्या मुखांतून समुद्राच्या भरतीचें पाणी कित्येक मैल आंत जातें ह्मणून त्यांस खाड्या ह्मणतात. त्यांतून लहान नावा चालतात. ठाणें जिल्ह्यांतील दातिवरें व वसई, कुलाबा जिल्ह्यांतील पनवेल व रोहें, आणि रत्नागिरी जिल्ह्यांतील बाणकोट व अंजनवेल, या ठिकाणच्या खाड्या बऱ्याच मोठ्या आहेत.

सह्याद्रीच्या पूर्व बाजूस नाशिक जिल्ह्यांत गोदावरी, पुणें जिल्ह्यांत भीमा व सातारा जिल्ह्यांत कृष्णा ह्या तीन मोठ्या नद्या उगम पावून पूर्वेकडे वाहत जातात. गोदावरी ही त्र्यंबकेश्वर येथें उगम पावून नाशिक व नगर ह्या जिल्ह्यांतून वाहत जाऊन पुढें निजामच्या राज्यांत गेली आहे. भीमा ही भीमाशंकर येथें उगम पावून पुणें व सोलापूर जिल्ह्यांतून वाहत जाऊन पुढें निजामचे राज्यांत कृष्णा नदीस मिळते. कृष्णानदी ही महाब्ळेश्वर येथें उगम पावून सातारा, बेळगांव व विजापूर ह्या जिल्ह्यांतून वाहत गेली आहे.

सह्याद्रीच्या पूर्वेकडचा प्रदेश बराच सपाट असल्यामुळें व बंगालचा समुद्र फार दूर असल्यामुळें, पूर्वेकडे वाहणाऱ्या नद्या बऱ्याच लांब, रुंद, पुष्कळ जलसंचयाच्या व संथ वाहणाऱ्या आहेत. या वरील मुख्य तीन नद्यांशिवाय पूर्व व पश्चिम खानदेश या दोन जिल्ह्यांतून वाहत जाणारी तापी नदी व महाराष्ट्राच्या उत्तर सरहद्दीवरून वाहत जाणारी नर्मदा नदी, या महाराष्ट्रांतील आणखी दोन मोठ्या नद्या आहेत. त्या पश्चिमेकडे वाहत जातात.

# कालवे व तलाव.

सह्याद्रीवर दरसाल पुष्कळ पाऊस पडतो. परंतु पावसाचें सर्व पाणी नद्यांवाटे समुद्रास जाऊन मिळतें. ह्मणून नद्यांना बांध घालून त्यांचें पाणी सांठवून कालवे आणि पाट ह्यांच्या द्वारें तें शेतीस पुरवितात व त्यामुळें पावसाच्या लहरीवर शेतकऱ्यांस अवलंबून राहावें लागत नाहीं. महाराष्ट्राच्या पूर्वभागीं देशावर जेथें पाऊस अनियमित व अपुरा पडतो, व जेथें वारंवार दुष्काळ पडण्याची भीति असते, तेथें कांहीं नद्यांना धरणें बांधून तलाव निर्माण केले आहेत.

नाशिक जिल्ह्यांत कळवण तालुक्यांतील चणकापूरच्या तलावामुळें गिरणा नदीस पाण्याचा पुरवठा होऊन गिरणेचे कालवे नाशिक जिल्ह्याच्या उत्तरभागीं व पूर्व खानदेशच्या नैर्ऋत्यभागीं काढले आहेत. तसेंच दारणानदीस मोठा बंधारा बांधून सांठविलेलें पाणी गोदावरींत सोडून तिच्या उजव्या व डाव्या बाजूस दोन कालवे सुरू केले आहेत. ह्या कालव्यांनीं नाशिक व नगर ह्या जिल्ह्यांतील सुमारें ५०००० एकर क्षेत्र भिजत आहे. पुणें जिल्ह्यांतील मुठा नदीच्या कालव्याला लेक् फाईफ अथवा खडकवासला या तलावानें पाण्याचा पुरवठा केला आहे. या कालव्याखालीं सुमारें २५००० एकर क्षेत्र भिजत आहे. अहमदनगर जिल्ह्यांतील भंडारदरा येथील तलाव व भोर संस्थानांतील लेक् व्हायटिंग् अथवा भाटघरचा तलाव ह्यांनीं अनुक्रमें प्रवरा व नीरा या नद्यांच्या कालव्यांना पाण्याचा पुरवठा होत आहे. महाराष्ट्रांतील हे सर्व मुख्य तलाव व कालवे नकाशांत दाखविले आहेत.

कालवे व तलाव.
जळगांव
धुळें
जामदा
गिरणा कालवा
चणकापूर
गोदावरी डावी बाजू
नाशिक
दारणा
बील
तलाव
नांदूर
गोदावरी उजवी बाजू
प्रवरा डावी
प्रवरा उजवी
भंडारदरा
ठाणें
नगर
पुणें
अलिबाग
लेक फाईफ
भाटघर
नीरा डावी बाजू
लेक व्हाइटिंग
नीरा उजवी बाजू
आष्टी
सोलापूर
रेवडी
म्हसवड
सातारा
रत्नागिरी


२ कालवे व तलाव.




४ भाटघर धरण.

# भाटघरचें धरण.

पुणें जिल्ह्यांतील नीरा व मुठा ह्या दोन नद्यांचे कालवे आज बरींच वर्षें सुरू आहेत. नीरा कालव्यास ज्या तलावापासून पाण्याचा पुरवठा होतो, तो तलाव भोर संस्थानांत भाटघर येथें आहे. तेथील नीरा नदीस धरण बांधून हा तलाव बांधला आहे. ह्या धरणाच्या कामास सन १८८१ मध्यें सुरवात होऊन तें सन १८९६ मध्यें पुरें झालें. परंतु या तलावाचें पाणी अपुरें पडूं लागल्यामुळें सन १९१३ पासून दुसरें फार मोठें नवीन धरण बांधण्याचें काम सुरू होऊन तें सन १९२७ सालीं पूर्ण झालें.

चित्रांत भाटघर येथील या नवीन **लॉईड** धरणाचा देखावा दाखविला आहे. धरणाचे पायथ्याशीं पाणी सोडण्याकरितां ठेवलेलीं आठ द्वारें चित्रांत दिसत आहेत. ह्या धरणाची लांबी एक मैल असून उंची १९० फूट आहे. बांधकामाचे मानानें हें जगांतील सर्वांत मोठें धरण आहे. येथील तलावाचें क्षेत्रफळ १५ चौ० मैल असून त्यांत २४०० कोटी घनफूट पाणी राहतें. नीरेच्या डाव्या कालव्यानें पुणें जिल्ह्यांतील भिमथडी व इंदापूर तालुक्यांस हें पाणी मिळतें. तिच्या नवीन उजवेकडील कालव्यानें सातारा जिल्ह्यांतील थोडें क्षेत्र, फलटण संस्थानांतील बराचसा भाग व सोलापूर जिल्ह्यांतील माळशिरस व पंढरपूर हे तालुके, ह्यांस फायदा होईल. ह्या दोन्ही कालव्यां-खालीं मिळून एकंदर सुमारें दोन लक्ष एकर क्षेत्र भिजेल. या धरणाचें बांधकाम, रचना, विस्तीर्णपणा, मजबुती, वगैरे अनेक गोष्टींमुळें तें फारच प्रेक्षणीय झालें आहे.

# भंडारदरा येथील धरण.

हें धरण नगर जिल्ह्यांतील अकोलें गांवाच्या नैर्ऋत्येस बावीस मैलांवर आहे व जी० आय्० पी० रेल्वेच्या घोटी स्टेशनापासून आग्नेयेस वीस मैलांवर आहे. अहमदनगर जिल्ह्यांत पाऊस अपुरा व अनियमित पडत असल्यामुळें तेथें वारंवार दुष्काळ पडतो. ह्मणून ह्या जिल्ह्यांतील शेतीस कालव्यांच्या द्वारें पाण्याचा पुरवठा करण्याकरितां सह्याद्रीच्या डोंगरांत 'भंडारदरा' येथें मुंबई सरकारच्या पाटबंधाऱ्याच्या खात्याकडून एक प्रचंड धरण बांधण्यांत आलें आहे.

चित्रांत धरणाचा देखावा दिसत आहे. त्यावरून त्याच्या भव्यपणाची कल्पना होईल. त्याची उंची २७० फूट व लांबी १६०० फूट आहे व त्यामुळें १३०० कोटी घनफूट पाणी अडविलें जातें. तलाव पूर्ण भरला ह्मणजे त्याचें क्षेत्र सहा चौरस मैल होतें. तलावांतील पाणी हळूहळू प्रवरा नदीचे पात्रांत सोडण्यांत येतें. धरणापासून प्रवरा नदींतील कालव्याचें उगमस्थान ५० मैल दूर आहे.

हल्लीं प्रवरेचे दोन्ही बाजूंचे कालवे सुरू झाले आहेत व त्यांच्याखालीं नगर जिल्ह्यांतील संगमनेर, राहुरी, कोपरगांव व नेवासें ह्या तालुक्यांतील सुमारें अर्धा लक्ष एकर जमीन भिजत आहे.



५ भंडारदरा येथील धरण.


धुळे
जळगांव
ठाणे
मुंबई
अलिबाग
नगर
सोलापूर
रत्नागिरी
हवामान.
८०-९० अंश
९०-९५ ,,
९५-१०० ,,
१००-११० ,,

६ हवामान.

# हवामान.

हवामानाच्या दृष्टीनें महाराष्ट्राचे चार भाग होतात. ते नकाशांत दाखविले आहेत. हे भाग साधारणपणें समुद्रकिनाऱ्याशीं समांतर आहेत. ह्या चार भागांस कोंकण, घाटमाथा, मावळ व देश अशीं नांवें देतां येतील.

कोंकणपट्टींतील प्रदेश सखल असल्यामुळें तेथील हवा एकंदरीनें उष्ण आहे, परंतु समुद्र जवळ असल्यामुळें निरनिराळ्या ऋतूंमधील उष्णतामानांत फारसा फरक पडत नाहीं; ह्मणून तेथील हवेस ‘ समहवा ’ म्हणतात. कोंकणांतील कमाल उष्णतामान ९०° ते ९५° असून किमान उष्णतामान ६०° ते ६५° असतें. घाटमाथ्यावरील प्रदेश बराच उंच असल्यामुळें तेथील हवा एकंदरीनें थंड आहे. तेथील कमालीचें उष्णतामान ८०° ते ९०° असून किमान उष्णतामान ५०° ते ६०° असतें. महाराष्ट्रांतील उन्हाळ्यांत राहण्याचीं थंड हवेचीं ठिकाणें या भागांतच आहेत. तिसऱ्या भागांत देशावरील अति पश्चिमेकडचा प्रदेश येतो. हा प्रदेश कोंकणापेक्षां अधिक उंच असल्यामुळें तेथील हवा साधारणपणें थंड आहे. परंतु हा भाग समुद्रापासून बराच दूर असल्यामुळें तेथील उन्हाळा व हिंवाळा ह्यांतील उष्णतामानांत बराच फरक पडतो. ह्या भागांतील कमाल उष्णतामान ९५° ते १००° असून किमान उष्णतामान ४५° ते ५०° असतें. चौथा पूर्वेंकडील भाग बराच सपाटीचा असल्यामुळें व समुद्रापासून फार दूर असल्यामुळें तेथें उन्हाळा व हिंवाळा हे फारच कडक असतात. चौथ्या भागांतील कमाल उष्णता १००° ते ११०° असते आणि किमान उष्णता ४०° ते ४५° असते. ह्मणून तेथील हवेस ‘विषम हवा’ असें ह्मणतात.

# हवामान.

हवामानाच्या दृष्टीनें महाराष्ट्राचे चार भाग होतात. ते नकाशांत दाखविले आहेत. हे भाग साधारणपणें समुद्रकिनाऱ्याशीं समांतर आहेत. ह्या चार भागांस कोंकण, घाटमाथा, मावळ व देश अशीं नांवें देतां येतील.

कोंकणपट्टींतील प्रदेश सखल असल्यामुळें तेथील हवा एकंदरीनें उष्ण आहे, परंतु समुद्र जवळ असल्यामुळें निरनिराळ्या ऋतूंमधील उष्णतामानांत फारसा फरक पडत नाहीं; ह्मणून तेथील हवेस ‘ समहवा ’ म्हणतात. कोंकणांतील कमाल उष्णतामान ९०° ते ९५° असून किमान उष्णतामान ६०° ते ६५° असतें. घाटमाथ्यावरील प्रदेश बराच उंच असल्यामुळें तेथील हवा एकंदरीनें थंड आहे. तेथील कमालीचें उष्णतामान ८०° ते ९०° असून किमान उष्णतामान ५०° ते ६०° असतें. महाराष्ट्रांतील उन्हाळ्यांत राहण्याचीं थंड हवेचीं ठिकाणें या भागांतच आहेत. तिसऱ्या भागांत देशावरील अति पश्चिमेकडचा प्रदेश येतो. हा प्रदेश कोंकणापेक्षां अधिक उंच असल्यामुळें तेथील हवा साधारणपणें थंड आहे. परंतु हा भाग समुद्रापासून बराच दूर असल्यामुळें तेथील उन्हाळा व हिंवाळा ह्यांतील उष्णतामानांत बराच फरक पडतो. ह्या भागांतील कमाल उष्णतामान ९५° ते १००° असून किमान उष्णतामान ४५° ते ५०° असतें. चौथा पूर्वेंकडील भाग बराच सपाटीचा असल्यामुळें व समुद्रापासून फार दूर असल्यामुळें तेथें उन्हाळा व हिंवाळा हे फारच कडक असतात. चौथ्या भागांतील कमाल उष्णता १००° ते ११०° असते आणि किमान उष्णता ४०° ते ४५° असते. ह्मणून तेथील हवेस ‘विषम हवा’ असें ह्मणतात.


धुळें
जळगांव
नाशिक
नगर
अलिबाग
पुणें
सोलापूर
सातारा
रत्नागिरी
पावसाचें मान.
२० इंचां पर्यंत.
३० ते ४० इंच पर्यंत
४० ते १०० " "
१०० ते २५० " "
२५० इंचांवर.

७ पावसाचें मान.




८ सुपीकता.

# जमिनीची सुपीकता.

महाराष्ट्राच्या जमिनीकडे सुपीकतेच्या दृष्टीनें पाहिलें असतां तिचे मुख्य पांच भाग होतात. बाजूच्या नकाशांत हे पांच भाग काळ्या रंगानें दाखविले आहेत. देश कोंकणापेक्षां अधिक सुपीक आहे. देशांत जसजसें पूर्वेकडे जावें तसतशी जमीन सखल होत गेल्यामुळें तिचा सुपीकपणा वाढत जातो. कारण, शेजारच्या उंच प्रदेशांतील पाणी, माती व गाळ हे तेथें येऊन सांचतात व जमिनीवर मातीचा जाड थर पसरतो. सह्य पर्वतावर जरी फार पाऊस पडतो तरी त्यावरील प्रदेश फार डोंगराळ असल्यामुळें तो सर्वांत कमी सुपीक आहे. हा प्रदेश नकाशांत पांढऱ्या रंगानें दाखविला आहे. देशावरील मधला पट्टा कमी डोंगराळ व साधारण सखल असल्यामुळें तेथील जमीन बरीच सुपीक आहे. परंतु देशावरील अगदीं पूर्वेकडील पट्टा जास्त सखल असल्यामुळें तेथील जमीन अधिक सुपीक आहे. हा पट्टा नकाशांत पूर्ण काळ्या रंगानें दाखविला आहे. ह्यांत ज्या वर्षीं पाऊस पुरेसा पडतो त्या वर्षीं उत्तम पीक येतें. कोंकणांतील भाग डोंगराळ व उतरता असल्यामुळें त्यांतील माती पावसाचे पाण्याबरोबर वाहून जाते, ह्मणून तेथील जमीन फारशी कसदार नाहीं. अगदीं समुद्रकांठचा प्रदेश साधारण सपाट असल्यामुळें तेथील जमीन कांहींशी सुपीक आहे. ही नकाशांत साधारण काळ्या रंगानें दाखविली आहे. कोंकणांत पुरेसा पाऊस बराच नियमित पडत असल्यामुळें एकंदरीनें पिकें बरीं येतात.

# मुख्य पिकें.

महाराष्ट्रांतील मुख्य पिकें ज्वारी, बाजरी, गहूं, भात, कापूस व ऊस, हीं होत. भाताच्या पिकास उष्ण हवा व पुष्कळ पाऊस लागतो. ही स्थिति कोंकणपट्टी व मावळ, ह्मणजे सह्याद्रीला लागून असणारा देशावरील जिल्ह्यांचा पश्चिमभाग, ह्यांत असल्यामुळें तेथें भात पिकतें. देशावरील सर्वसाधारण पिकें ज्वारी व बाजरी हीं होत. बेताचा पाऊस व उष्ण हवा ह्या गोष्टी ह्या पिकांस जरूर आहेत, व त्या देशावर असल्यामुळें हीं पिकें तेथें चांगलीं होतात. भात, ज्वारी व बाजरी हीं पिकें पावसाळ्यांत होतात व त्यांस खरिपाचीं पिकें असें म्हणतात. गहूं हें महाष्ट्रांतील चौथें महत्त्वाचें पीक होय. हें पीक पावसाळ्यानंतर थंडीच्या दिवसांत होतें. ह्यास रब्बीचें पीक असें ह्मणतात. ह्या पिकास उत्तम काळी जमीन व कडक थंडी लागते, ह्मणून नाशिक व खानदेश या जिल्ह्यांत गहूं बराच पिकतो. कापसास काळी कसदार जमीन, बेताचा पाऊस व उष्ण हवा, ह्यांची जरूरी असते. अशी स्थिति देशावरील पूर्वपट्टींत, विशेषतः संयुक्त खानदेशांत, असल्यामुळें तेथें कापसाचें पीक बरेंच होतें. ऊस हें बागाइताचें पीक आहे. ह्यास चांगली जमीन व भरपूर पाणी पाहिजे. देशावर ज्या ठिकाणीं कालव्याच्या अगर पाटाच्या पाण्याची व विहिरीची सोय असते, अशा ठिकाणीं उसाचें पीक मोठ्या प्रमाणावर होतें. पुणें, सातारा, नगर व नाशिक ह्या जिल्ह्यांत उसाचें पीक बरेंच आहे. महाराष्ट्राच्या प्रत्येक जिल्ह्यांतील मुख्य पिकें नकाशांत चित्रांच्या रूपानें दाखविलीं आहेत.


गहूं
धुळें
कापूस
ज्वारी
नाशिक
गहूं
भात
ठाणें
मुंबई
अलिबाग
भात
पुणें
ऊंस
नगर
बाजरी
बाजरी
सोलापूर
सातारा
ज्वारी
भुयमूग
ज्वारी
रत्नागिरी
भात
भात
पिकें.

९ मुख्य पिकें.



१० ज्वारीचें शेत.

# ज्वारी.

ज्वारीचें पीक खरीप व रब्बी या दोन्ही हंगामांत होतें. या पिकास साधारण कसदार जमीन, उष्ण हवा व मध्यम पाऊस लागतो. महाराष्ट्रांत या पिकाचें सरासरी क्षेत्र सुमारें पस्तीस लक्ष एकर आहे. हें पीक सोलापूर, सातारा, नगर, पुणें व प० खानदेश या जिल्ह्यांत बरेंच होतें. पेरणीच्या वेळावरून ज्वारीच्या दोन जाती झाल्या आहेत. खरिपांत म्हणजे मृगाच्या सुमारास जी पेरितात, तीस डुकरी किंवा कार असें ह्मणतात. रब्बींत ह्मणजे हस्ताच्या सुमारास जी पेरितात, तीस शाळू असें ह्मणतात. खरिपांतील जोंधळ्यांत त्याच्या रंगावरून मुख्य दोन जाती मानितात. एक तांबडा व दुसरा पांढरा किंवा कांहींसा पिवळा. पांढऱ्या जातीचा जोंधळा खानदेशांत विशेष पिकतो. सोलापूर व सातारा ह्या जिल्ह्यांत रब्बीच्या हंगामांत जोंधळा फार पिकतो. ह्यास चांगल्या जातीची ह्मणजे जींत पाण्याचा ओलावा फार दिवस राहतो अशी जमीन लागते. शाळू अगर रब्बीचा जोंधळा हा खरिपाच्या जोंधळ्यापेक्षां अधिक गोड व पौष्टिक असतो. जोंधळ्याचें पीक साधारण चारपांच महिन्यांत तयार होतें व तें नऊ दहा फूट उंच वाढतें. चित्रांत जोंधळ्याचें तयार झालेलें एक शेत दिसत आहे. त्यांत एक मनुष्य उभा आहे. त्यावरून जोंधळा किती उंच वाढतो, ह्याची सहज कल्पना होईल. जोंधळ्याचें ताट जाड असून कणीसही बरेंच मोठें असतें. हें कणीस कोंवळेपणीं भाजून खातात, त्यास हुरडा म्हणतात. जोंधळ्याचा कडबा गुरांस खाण्यास घालतात. तो फार सकस असून त्यांस चांगला मानवतो. खरिपांतील जोंधळ्याचें उत्पन्न दर एकरीं सरासरी जिराईत व बागाईत जमिनींत अनुक्रमें ३०० ते ७५० शेर ( ६०० ते १५०० पौंड ) येतें.

# बाजरी.

बाजरी हें खरिपाचें पीक असून तें देशावर बऱ्याच ठिकाणीं होतें. महाराष्ट्रांतील पिकाच्या सरासरी क्षेत्रांत बाजरीचें क्षेत्र सर्वांत अधिक असून तें सुमारें चाळीस लक्ष एकर होईल. ह्या पिकास पाऊस कमी व हवा उष्ण लागते. कोंकणांत पाऊस फार पडत असल्यामुळें तेथें बाजरी मुळींच होत नाहीं. बरड, लापण आणि माळ जमिनींत बाजरीचें पीक काढितात. काळ्या व चिकण जमिनींत बाजरी चांगली होत नाहीं. काळ्या जमिनींतील बाजरी पाऊस जास्त पडला असतां पिवळी व रोगट होते.

बाजरीचें शेत उन्हाळ्यांत उत्तमप्रकारें नांगरून ठेवितात. मृग व आर्द्रा या नक्षत्रांचा पाऊस पडला ह्मणजे बाजरीची पेरणी करितात. रोपें मोठीं झालीं म्हणजे एक दोन वेळां कोळपणी करितात आणि गवत व हरळी साफ काढून टाकितात. बाजरीस फारसें खत घालीत नाहींत. कोठें कोठें उकिरड्याचें खत घालितात. बाजरी पेरल्यापासून सुमारें चार महिन्यांनीं तयार होते. तयार असलेलें बाजरीचें शेत चित्रांत दिसत आहे. बाजरीचें पीक चांगलें आलें तर त्याची उंची पांचसहा फूट असते. बाजरीचें ताट साधारणपणें बोटाएवढें जाड असतें. बाजरीचें कणीस फार जाड नसतें, परंतु त्याची लांबी सुमारें सात आठ इंचपर्यंत असते. चित्रांत ताटांच्या टोंकांस आलेलीं कणसें दिसत आहेत. प्रत्येक ताटास बहुधा एकच कणीस येतें. बाजरीचें उत्पन्न सरासरी दर एकरीं दोनशें ते साडेतीनशें शेर ( ४०० ते ७०० पौंड ) येतें. जोंधळ्याप्रमाणेंच बाजरी हें देशावरील पुष्कळ लोकांचें खाण्याचें मुख्य धान्य आहे.



११ बाजरीचें शेत.



१२ गव्हाचें शेत.

# गहूं.

गहूं हें मुख्यत्वेंकरून रब्बीचें पीक आहे. महाराष्ट्रांत या पिकाखालीं सुमारें दहा लक्ष एकर जमीन आहे. गव्हास कोरडी व थंड हवा आणि काळी व नदीकांठाची मळईची जमीन फार उत्तम मानवते. अशा जमिनींत ओलावा जास्त दिवस सांठवून ठेवण्याची शक्ति असल्यामुळें तेथें गहूं उत्तम होतो. महाराष्ट्रांत अशी परिस्थिति विशेषत: खानदेशांत तापीनदीच्या कांठीं व नाशिक जिल्ह्यांत गोदावरीच्या तीरीं आहे, ह्मणून तेथें गव्हाचें पीक बरेंच होतें. पुणें जिल्ह्यांतही गव्हाचें पीक थोडेसें होतें. सातारा व सोलापूर या जिल्ह्यांत हें पीक होत नाहीं असें म्हटलें तरी चालेल. कोंकणांत हें पीक मुळींच होत नाहीं.

गव्हाची पेरणी पाऊस संपण्याचे सुमारास ह्मणजे दसरा व दिवाळी यांचे दरम्यान करितात. गहूं पेरल्यापासून चार पांच महिन्यांनीं तयार होतो. गव्हाचें झाड दोनतीन हात उंच वाढतें व त्यास शेवटीं ओंब्या येतात. चित्रांत ओंब्या आलेलें गव्हाचें शेत दिसत आहे. त्यामध्यें दोन पुरुष उभे आहेत. त्यांवरून पिकाच्या उंचीची कल्पना येईल. जिराईत गहूं व बागाईत गहूं असे गव्हाचे मुख्य दोन प्रकार आहेत. जिराईत गव्हांत शेतगहूं, बनशी वगैरे जाती असून बागाईत गव्हांत बक्षी, खपली वगैरे जाती आहेत. जिराईत व बागाईत जमिनींत अनुक्रमें २५० ते ७५० शेर ( ५०० ते १५०० पौंड ) एकरीं उत्पन्न असतें.

गहूं हा सर्व धान्यांत अत्यंत पौष्टिक आहे, म्हणून रोजच्या जेवणांत गव्हाची पोळी करितात. गव्हापासून खाण्याचे निरनिराळे अनेक पदार्थही तयार होतात.

# भात.

भाताच्या पिकास साधारण प्रतीची जमीन चालते. परंतु पाऊस मात्र भरपूर पाहिजे. ह्मणून हें पीक मुख्यतः कोंकणपट्टींत होतें. तसेंच देशावरील जिल्ह्यांतील सह्याद्रीस लागून असलेल्या पश्चिमपट्टींत, म्हणजे मावळांतही, पाऊस बराच पडत असल्यामुळें हें पीक होतें. महाराष्ट्रांत भाताच्या पिकाचें क्षेत्र सरासरी बारा लक्ष एकर आहे.

भाताच्या पिकासंबंधीं सर्वच गोष्टी ज्वारी, बाजरी, गहूं ह्या पिकांहून अगदीं भिन्न आहेत. भाताच्या शेतांत सतत पाणी राहण्याची जरूरी असल्यामुळें त्याच्याभोंवतीं बांध घालावे लागतात. इतर धान्यांप्रमाणें भाताचें बीं एकदम पेरून चालत नाहीं. प्रथम पेरणी करण्याकरितां जमिनीचा जो लहानसा तुकडा, आंतील मूळ व कीड नाहींशी करण्याकरितां भाजून तयार करितात, त्यास ‘राब’ म्हणतात. त्यांत खत वगैरे घालून भाताचें बीं रोहिणी नक्षत्रांत पेरतात. सुमारें तीन महिन्यांनीं बीं उगवून फूट दीडफूट उंचीचा रोपा तयार होतो. नंतर ऑगष्ट महिन्यांत भाताची लावणी करितात. भाताचें शेत गुढघ्यापासून कधीं कधीं डोक्यापर्यंतही उंच वाढतें. प्रत्येक झाडाच्या शेंड्यास एक लोंब येते. ही लोंब सरासरी वीतभर लांब असून ती भारामुळें लवलेली असते. चित्रांत लोंबी आलेलें भाताचें शेत दिसत आहे व त्यांत एक मनुष्यही उभा आहे. नोव्हेंबरअखेर हें पीक तयार होतें. त्याचें एकरीं उत्पन्न सुमारें पांचशें ते साडेसातशें शेर ( १००० ते १५०० पौंड ) होतें. शेतांतील पिकाची मळणी झाल्यावर तें टरफल असलेलें धान्य भरडून व सडून नंतर त्यापासून खाण्यास उपयोगी असे तांदूळ करितात. भाताच्या पुष्कळ जाती आहेत. त्यांपैकीं कोळंबा, कमोद, आंबेमोहोर, चिमणसाळ, रायभोग वगैरे जाती चांगल्या आहेत.



१३ भाताचें शेत.



१४ कापसाचें शेत.

# कापूस.

कापूस हें एक महाराष्ट्रांतील महत्त्वाचें पीक आहे. या पिकाखालीं महाराष्ट्रांत वीस लक्ष एकर जमीन आहे व तीपैकीं १४ लक्ष खानदेशांत आहे. कापसाच्या पिकास कसदार जमीन, उष्ण व विषम हवा आणि बेताचा पाऊस ह्यांची आवश्यकता असते. ही स्थिति देशावरील पूर्वपट्टींत असल्यामुळें तेथें कापसाचें पीक होतें.

महाराष्ट्रांत कापसाचें पीक मुख्यतः खानदेशांत व त्याच्या खालोखाल अहमदनगर, सोलापूर, नाशिक व सातारा ह्या जिल्ह्यांत होतें. कापसाची पेरणी मृगनक्षत्राच्या पावसांत करितात. त्यास दोन वेळां खुरपणी व चार पांच वेळां कोळपणी द्यावी लागते. हें पीक चार पांच फूट उंच वाढतें. एका झाडावर बरींच बोंडें येतात. बोंडें जून झालीं ह्मणजे आपोआप फुटून त्यांतील पांढरा कापूस बाहेर दिसूं लागतो. कापसाचें शेत पेरल्यापासून पांच साडे पांच महिन्यांनीं तयार होतें. बोंडें जसजशीं फुटून तयार होतात, तसतशीं तीं वेंचून कापूस काढावा लागतो. दोन तीन वेळां अशी वेंचणी करावी लागते. दर एकरीं उत्पन्न सुमारें १७५ शेर ( ३५० पौंड) येतें.

चित्रांत खानदेशांतील कापसाचें शेत दाखविलें आहे. त्यांतील झाडांचीं बोंडें फुटून सर्व शेत पांढरें झालेलें दिसत आहे. खानदेशांत पिकणारा कापूस आखुड धाग्याचा व खानदेशी नांवाच्या भेसळ जातीचा असतो. परंतु अलीकडे शेतकी खात्याच्या प्रयत्नामुळें 'एन् आर्' नांवाच्या कपाशीचा खानदेशांत बराच प्रसार झाला आहे. नगर, सोलापूर व नाशिक जिल्ह्यांत खानदेशी कपाशीच पेरितात. सातारा जिल्ह्यांत 'कुमठा' नांवाच्या कापसाचा पेरा मघा नक्षत्रांत करितात. ही जात लांब धाग्याची असून तिचें उत्पन्नही चांगलें येतें.

# ऊस.

उसास कसदार जमीन व पाण्याचा सतत पुरवठा ह्या गोष्टींची आवश्यकता असते. महाराष्ट्रांत पुणें, सातारा, नगर, नाशिक, ह्या जिल्ह्यांतील जमीन कसदार असून तेथें मुठा, नीरा, प्रवरा, गोदावरी, गिरणा, कादवा, वगैरे नद्यांचे कालवे काढलेले आहेत; ह्मणून ह्या जिल्ह्यांत उसाची लागवड मोठ्या प्रमाणावर होते.

उसाच्या मुख्य दोन जाती आहेत. एक नरम व दुसरा कडक. नरम जातीचा ऊस जाड, उंच व सरळ असतो. नरम ऊस साधारणपणें पांढरा व कडक ऊस तांबडा असतो. उसाचे हात हात लांबीचे तुकडे, डोळे वर करून शेतांत पुरतात व ह्या तुकड्यांस कोंब फुटून ऊस तयार होतो. नरम उसाची लागवड बहुतेक जानेवारी ते मार्च महिन्यांपर्यंत करितात. त्यास दर दहा बारा दिवसांनीं पाणी द्यावें लागतें. उसाचे पिकास शेणखत, पेंडीचें खत, मांसळी, अमोनियम् सल्फेट वगैरे क्षार खतें दिल्यास ऊस चांगला पोसतो. ऊस सुमारें अकरा महिन्यांनीं तयार होऊन गूळ करण्यास सुरवात होते. उसाचें चांगलें पीक आलें ह्मणजे दर एकरीं साडे तीन ते साडे पांच हजार शेर ( ७००० ते ११००० पौंड ) गूळ तयार होतो. त्याची किंमत बाजारभावाप्रमाणें ८०० ते १२०० रुपये येते व त्यास अदमासें खर्च सहा सातशें रुपये लागतो. उसापासून साखर तयार करण्याचे कारखाने पुणें जिल्ह्यांत बारामती आणि मांजरी व नगर जिल्ह्यांत बेलापूर येथें निघाले आहेत. महाराष्ट्रांत एकंदर उसाचें क्षेत्र सुमारें पाऊण लाख एकर आहे व त्यापासून होणाऱ्या गुळाचें उत्पन्न दरवर्षी सुमारें सहा कोटी रुपयांचें आहे. यावरून उसाच्या पिकाचें महत्त्व महाराष्ट्रांत किती आहे हें दिसून येईल.



१५ उसाचा मळा.




१६ मुख्य जंगली उत्पन्न.

# जंगली उत्पन्न.

महाराष्ट्रांत सह्याद्रि व सातपुडा ह्या दोन पर्वतांवरच विशेष जंगल आहे. महाराष्ट्रांतील जंगलांचें क्षेत्रफळ सुमारें ८५०० चौरस मैल आहे. म्हणजे महाराष्ट्राच्या जमिनीपैकीं जवळजवळ पांचवा हिस्सा जंगल आहे. त्यापैकीं सुमारें ६००० चौरस मैलाच्या प्रदेशावर 'राखीव जंगल' असून त्यांत मोठमोठ्या वृक्षांचीं दाट अरण्यें आहेत.

महाराष्ट्रांतील महत्त्वाचें जंगली उत्पन्न ह्मणजे सागाचें लाकूड होय. सह्याद्रि व सातपुडा ह्यांतील जंगलांतून दरसाल पुष्कळ साग तोडिला जातो. दुसरें महत्त्वाचें उत्पन्न हिरडा होय. हिरड्याचीं झाडें सह्याद्रींत फार आहेत. रंगाच्या कारखान्यासाठीं पुष्कळ हिरडा परदेशीं रवाना होतो. ताड, माड, शिंदी व मोहाचीं झाडें यांचें उत्पन्नही बरेंच मोठें आहे. हीं झाडें सातपुड्यांत व ठाणें जिल्ह्यांतील जंगलांत आहेत. ह्यांपासून दारू काढितात. सह्याद्रि व सातपुडा यांतील जंगलांत बांबूचें उत्पन्नही पुष्कळ होतें. ह्यांशिवाय जंगलांतील महत्त्वाचें उत्पन्न ह्मणजे जळाऊ लाकूड व गवत होय. हें उत्पन्न महाराष्ट्रांतील सर्व जंगलांत होतें. तथापि सह्याद्रि व सातपुडा ह्यांतील जंगलांतून ह्यांचा पुरवठा मोठ्या प्रमाणावर होतो. कुलाबा व ठाणें जिल्ह्यांतील जंगलामध्यें जळाऊ लाकडापासून कोळसा तयार करण्याच्या अनेक भट्ट्या आहेत. कोंकणांतील जंगलांत काजूचीं झाडें होतात. सातपुड्यांत चारोळ्या व रोशेलचें गवत ह्यांचें उत्पन्न होतें. महाराष्ट्रांतील मुख्य जंगली उत्पन्न नकाशांत चित्रांच्या रूपानें दाखविलें आहे.

# साग.

सागाचें लाकूड हें सर्व प्रकारच्या इमारती लाकडांत श्रेष्ठ प्रकारचें लाकूड आहे. सागाचें झाड चांगलें वाढलें ह्मणजे त्याची उंची १०० ते १२५ फूटपर्यंत असते व त्याच्या खोडाचा घेरही मोठा असतो. चित्रांत सागाचें झाड दिसत आहे. ह्या झाडाचीं पानें फारच मोठालीं असतात. कोंकणांत भाताच्या कणग्यांच्या आंतल्या बाजूस व गवती छपरांच्या खालीं हीं पानें घालितात. सागाच्या लाकडांत एक प्रकारचें तेल असतें. त्यामुळें त्याच्या अंगीं टिकाऊपणा येतो. हें तेल औषधी असून त्याचें रोंगणही करितात. सागवानास वाळवी अगर दुसरी कीड फारशी लागत नाहीं. हें लाकूड पाण्यांतही कुजत नाहीं, म्हणून त्याचा उपयोग मचवे व मोठमोठीं जहाजें बांधण्याकरितां होतो. घरें बांधतांना सागापासून तुळ्या, वासे, चौकटी, फळ्या, वगैरे तयार करितात. त्याचप्रमाणें मेजें, पलंग, खुर्च्या, कपाटें, पेट्या, वगैरे उपयोगी वस्तूही त्यापासून तयार करितात.

महाराष्ट्रांत उत्पन्न होणाऱ्या सागास गांवठी साग असें ह्मणतात. तो टिकाऊ व मजबूत असतो. परंतु त्याचे अंगीं नरमपणा नसल्यामुळें त्याच्यावर नकशीचें वगैरे बारीक काम सफाईदार होत नाहीं. त्या कामीं मलबारी व मोलमीन ( ब्रह्मदेश ) सागाचा उपयोग करितात.

# बांबू.

बांबू डोंगराळ जमिनींत होतो. त्यास पाण्याची जरूरी नसते. त्याची उत्पत्ति बियांपासून अगर केळीच्या झाडाप्रमाणें मुळांशीं कोंब फुटून होते. यास बांबू अगर कळक ह्मणतात. कळकांचें एक दाट बेट चित्रांत दिसत आहे. हीं बेटें केव्हां केव्हां इतकीं दाट असतात कीं, त्यांत कोल्ह्याकुत्र्यासारख्या लहान प्राण्यांचाही प्रवेश होत नाहीं, हें चित्रावरून स्पष्ट दिसेल. सह्याद्रीच्या व सातपुड्याच्या डोंगराळ प्रदेशांत कळकांचीं मोठमोठीं बेटें आहेत.

कळकांच्या अनेक जाती आहेत. कांहीं झाडें मनुष्याच्या मांडीएवढालीं तर कांहीं मनगटाएवढीं जाड असतात. त्यांची उंचीही कमजास्त असते. कित्येक जातींचे कळक ४०–५० हात उंच वाढतात. कांहीं जातींच्या झाडांस कांटेरी फांद्या फुटतात. चित्रांत फांद्या नसलेल्या जातीच्या कळकाचें एक बेट दाखविलें आहे. बहुतेक कळक पोंकळ असतात. पण कांहीं जातींचे लहान कळक भरीवही असतात. कळक टिकाऊ, चिवट, लवचीक, वजनानें हलके व किंमतीनें स्वस्त असतात.

कळक फार उपयोगी आहेत. जाडे कळक वाशांच्या ऐवजीं घर बांधतांना उपयोगीं पडतात. कळकाच्या लांब काठ्यांचा मांडवाचे कामीं व व्यवहारांत अनेक प्रसंगीं उपयोग होतो. बुरूड लोक त्यापासून तट्टे, टोपल्या, सुपें, कणगे, पंखे वगैरे अनेक उपयोगी पदार्थ तयार करितात. बांबूपासून एक प्रकारचा रांधा तयार करून त्यापासून कागदही तयार करितात.

# हिरडा.

हिरड्याचें झाड जंगली असून तें डोंगरावर पाण्याशिवाय उगवतें. सह्याद्रींत हिरड्याचीं झाडें पुष्कळ आहेत. हें झाड २५—३० फूट उंच वाढतें व त्याचा विस्तारही बराच मोठा असतो. झाड लावल्यापासून आठदहा वर्षांनीं लागास येतें व तें ५०—६० वर्षेपर्यंत टिकतें. ह्या झाडाचें रोप झाडाखालीं बीं पडून आपोआप उगवतें. ह्या झाडास श्रावण महिन्यांत फळें येतात व आश्विन महिन्यांत तीं जून होतात. हिरडे कोवळे असतांना मुद्दाम झाडावरून काढून वाळवितात. त्यांस 'बाळहिरडे' ह्मणतात. त्यांचा सारक औषधांच्या कामीं उपयोग होतो. चित्रांत फळें असलेलें एक हिरड्याचें झाड दाखविलें आहे. हिरडयाचें फळ लांबट असून त्याच्या सालीवर उभ्या रेषा असतात. हीं फळें चवीला तुरट असतात.

हिरडयाचा मोटा खप रंग तयार करण्याच्या कामीं होतो. हिरडयापासून शाई तयार करितात. चुना चिकट व बळकट होण्याकरितां हिरडयाच्या पाण्यांत तो कालविण्याची चाल आहे. अलीकडे रंगाच्या कारखान्यांत उपयोगांत आणण्यासाठीं हिरडा परदेशीं रवाना होऊं लागला आहे. महाराष्ट्रांत कोल्हापूर, सातारा, पुणें, ठाणें व रत्नागिरी ह्या जिल्ह्यांतील डोंगराळ भागांत हिरडा बराच होतो. तो व्यापाऱ्यांस बहुतकरून दरवर्षीं मक्त्यानें विकत देतात. जंगलांतील हिरडा गोळा करून पोत्यांमध्यें भरून मुंबईहून व्यापारी लोक तो परदेशीं रवाना करितात.



१९ हिरड्याचें झाड.




२० मुख्य उद्योगधंदे.

# मुख्य उद्योगधंदे.

महाराष्ट्रांतील मुख्य उद्योगधंदे चित्रांच्या रूपानें नकाशांत दाखविले आहेत. महाराष्ट्रांतील मुख्य धंदा शेतीचा आहे. ह्या धंद्यांत निदान शेंकडा ६० लोक गुंतलेले आहेत. शेतीसारखाच दुसरा धंदा म्हटला म्हणजे निरनिराळ्या जातींचीं फळें व भाज्या यांची लागवड करणें हा होय. नाशिक जिल्ह्यांत द्राक्षें, पुणें जिल्ह्यांत अंजीर व पेरू, नगर व खानदेश जिल्ह्यांत मोसंबी व संत्रीं, व ठाणें जिल्ह्यांत केळीं ह्यांचें उत्पन्न मोठ्या प्रमाणावर होतें. कोंकणांत नारळ, सुपारी, फणस, कलमी आंबे, ह्यांची लागवड बरीच आहे. शेतीच्या खालोखाल महाराष्ट्रांतील दुसरा महत्त्वाचा धंदा विणकामाचा होय. महाराष्ट्रांतील कापूस पिकणाऱ्या जिल्ह्यांत हातमागावर वस्त्रें विणण्याचा धंदा मोठ्या प्रमाणावर चालतो. त्याच जिल्ह्यांत कापडाच्या गिरण्याही निघाल्या आहेत. कोंकणांत समुद्राच्या पाण्यापासून मीठ तयार करणें व मासे धरणें, हे महत्त्वाचे धंदे आहेत.

हाताच्या शक्तीनें अल्प प्रमाणावर चालणारे पूर्वींचे कांहीं धंदे अलीकडे यांत्रिकशक्तीनें मोठ्या प्रमाणावर होऊं लागले आहेत. सातारा जिल्ह्यांत किर्लोस्कर ह्यांचा शेतीचीं औतें करण्याचा कारखाना व ओगले यांचा कांच-कारखाना, पुणें येथील भांडीं व जरतारी काम तयार करण्याचे कारखाने, मुंढवें (पुणें) येथील कागदाची गिरणी, तळेगांव येथील कांच-कारखाना, बेलापूर (नगर) येथील साखरेचा कारखाना, कोंकणांतील व नाशिक, पुणें ह्या जिल्ह्यांतील तांदुळाच्या गिरण्या, पनवेल (कुलाबा) येथील औषधें करण्याचा कारखाना, अंधेरी (ठाणें) येथील आगपेट्यांचा कारखाना, व खोपोली येथील विजेचा कारखाना हे आधुनिक तऱ्हेचे उद्योगधंदे आहेत.

# शेती.

पावसाळ्याच्या अखेर शेतांतील पीक काढून घेतल्यावर, पहिलें काम म्हणजे शेत नांगरणें होय. नांगरानें जमीन फुटून तिच्यांवरील थराचे तुकडे होतात. नांगरणी जितकी खोल करावी तितकें अधिक चांगलें. नांगरलेल्या जमिनीवर ऊन व हवा यांचें कार्य होतें. चित्रांत शेतकरी जमीन नांगरीत आहे असें दिसत आहे. नांगरणीनंतर पावसाळ्यापूर्वी शेतकरी जरूर असल्यास मोठीं ढेंकळें फोडितात व खत घालितात. पाऊस पडल्यावर पहिलें काम म्हणजे कुळव अगर वखर ह्याच्या साह्यानें जमीन साफ व सपाट करणें हें होय. जमीन साफ झाल्यावर पाभर नांवाच्या औतानें शेतांत बीं पेरितात. रोपें टीचभर उंच झालीं म्हणजे शेतांतून कोळपें नांवाचें औत फिरवून पिकां-मध्यें वाढलेलें गवत काढणें व जमीन मऊ व पोकळ करणें हीं निरनिराळीं कामें करितात. ह्यास कोळपणें, निंदणें अगर बेणणें असें म्हणतात. इतकें झाल्यावर शेतकरी पीक तयार होण्याची वाट पहात असतो. पीक तयार झाल्या-वर तें कापणें व कापलेल्या पिकाचा शेतांत अगर अन्य ठिकाणीं ढीग करून ठेवणें, ह्या गोष्टी त्यास कराव्या लागतात. नंतर कांहीं दिवसांनीं पिकाची मळणी करून कणसांपासून धान्य निराळें करावें लागतें. मळणी झाल्या-वर शेतकऱ्याच्या घरांत धान्य येऊन त्याच्या श्रमाची सार्थकता होते. येणेंप्रमाणें शेतकऱ्यास कोणतीं कामें करावीं लागतात, ह्याचें हें सामान्य वर्णन आहे. परंतु कांहीं कामें विशिष्ट पद्धतीनें करावीं लागतात. त्यांपैकींच भाताची लावणी करणें हें एक आहे.



२१ शेतकाम.



२२ भातशेती.

# भातशेती.

भाताचें पीक काढण्यास फार श्रम पडतात. प्रथम जमिनीच्या लहानशा भागांत भाताचें रोप तयार करावें लागतें व मागाहून तें काढून त्याची शेतांत लावणी करावी लागते. जमिनीच्या ज्या तुकड्यांत रोप तयार करावयाचें असतें, तेवढा भाग, जंगलांतील झाडांच्या फांद्या, पाला, पाचोळा, शेणी, गोवऱ्या वगैरे पदार्थ त्यावर पेटवून, जमिनींतील कीड व खोल गेलेलें मूळ नाहींसें करण्याकरितां व जमीन मऊ होऊन रोपें सहज उपटून यावीं ह्मणून, भाजतात. नंतर ती जमीन चांगली नांगरून पोकळ करितात व तींत जून महिन्याच्या सुमारास भाताचें बीं पेरितात. पाऊस पडल्यावर बीं वाढूं लागतें. सुमारें दोन महिन्यांत रोप फूट दीड फूट वाढून, खाचरांत लावण्यास योग्य होतें. ह्या रोपास आवण ह्मणतात. पावसाळा सुरू होतांच हीं भातखाचरें दोन तीन वेळां नांगरून व कोळवून जमीन मऊ करितात. ऑगस्ट महिन्यांत आवण तयार होतांच आणखी एक दोन वेळां जमीन नांगरून शेतांत चिखल करावा लागतो. लावणीचे वेळीं शेतांत पाणी भरपूर असावें लागतें. चिखल व पाणी यांनीं भरलेलें शेत चित्रांत दिसत आहे. ह्यास भातखाचर ह्मणतात. आवण उपटून आणल्यावर त्याच्या जुड्या बांधून त्या शेतांत टाकतात. नंतर लावणी करणारे मजूर, चित्रांत दाखविल्याप्रमाणें, एकएक जुडी घेऊन तींतील रोपांच्या आठदहा काड्या हातांत एकत्र धरून त्या चिखलांत रोवितात. हीं रोपें सुमारें एक फुटाच्या अंतरानें लावितात. रोपांचे शेंडे पाण्याच्यावर राहतील अशा प्रकारें त्यांची लावणी करावी लागते. हीं लावलेलीं रोपें तीन चार दिवसांनीं चांगलीं ाठ होतात. नंतर सुमारें तीन महिन्यांनीं त्यांस ओंब्या आल्यावर त्यांची कापणी व मळणी करितात.

# तांदुळांची गिरणी.

भातापासून तांदूळ तयार करण्याकरितां प्रथम भात एका मोठ्या लाकडी जात्यांत ( घिरटींत ) घालून भरडतात; त्यामुळें भातावरील टरफलें ( तूस ) व आंतील दाणे निरनिराळे होतात. नंतर सुपाच्या साह्यानें टरफलें उडवून आंतील दाणे निराळे करितात, त्यांस 'करड' ह्मणतात. ही करड उखळांत घालून मुसळानें तीनदां कुटतात आणि प्रत्येक वेळीं सुपानें पाखडून कोंडा नाहींसा करितात. नंतर खाण्यालायक तांदूळ तयार होतो. अशा रीतीनें तांदूळ करण्याची कृति सर्वत्र चालू आहे. परंतु हल्लींच्या यांत्रिक युगांत हीच कृति यंत्राच्या साहाय्यानें करण्याच्या गिरण्या निघाल्या आहेत. ठाणें व कुलाबा जिल्ह्यांत भाताचें पीक फारच मोठ्या प्रमाणावर होत असल्यामुळें, व मुंबई शहरीं गिऱ्हाईकही जवळ असल्यामुळें, गेल्या तीस चाळीस वर्षांत कल्याण, भिवंडी, शहापूर, पनवेल, महाड, वगैरे ठिकाणीं तांदुळाच्या गिरण्या सुरू झाल्या आहेत. पुणें व नाशिक जिल्ह्यांतही भाताचें पीक बरेंच होत असल्यामुळें तेथेंही ह्या गिरण्या हल्लीं दृष्टीस पडतात. भातापासून तांदूळ तयार होईपर्यंत सर्व कामें ह्या गिरण्यांतून यंत्रांनीं होत असल्यामुळें, तीं अल्प काळांत व थोड्या खर्चांत सफाईदार होतात.

चित्रांत तांदुळाच्या गिरणीमधील एक भाग दिसत आहे. तेथें उभा असलेला मुलगा यंत्रावर देखरेख करीत आहे. उखळांत तांदूळ कुटण्याचें काम चाललें असून तेथें एक मजूर उभा आहे. गिरणींत तांदूळ तयार झाल्यावर त्यास तकाकी येण्याकरितां एक प्रकारच्या यांत्रिक जात्यांतून तो काढितात. त्यास कीड लागू नये ह्मणून तांदुळाची पिठी व हळदीचा पिवळा रंग लावण्याची चाल कोठें कोठें दिसून येते.



२३ तांदुळाची गिरणी.



२४ नारळीचा बाग.

# नारळ.

भातशेतीच्या खालोखाल कोंकणांतील दुसरा महत्त्वाचा उद्योगधंदा ह्मटला ह्मणजे नारळ व आंबे यांच्या बागांचा होय. नारळाच्या झाडांस रेताड जमीन आणि उष्ण, दमट व खारी हवा मानवते. यामुळें कोंकणांत समुद्रकिनाऱ्यावर ह्या झाडांची लागवड फार मोठ्या प्रमाणावर होते. चित्रांत एक नारळाची बाग दाखविली आहे. नारळाच्या झाडास 'माड' असें ह्मणतात. हें झाड ५० फुटांपासून ७५ फुटांपर्यंत वाढतें. त्याच्या शेंड्यास चौफेर १० ते १५ फूट लांबीच्या सांवळ्या ( संयुक्त पानें ) असतात. चित्रांत उंच व सरळ अशीं माडाचीं झाडें व त्यांचे सांवळ्यांनीं भरलेले शेंडे दिसत आहेत. नारळाचें झाड आठ दहा वर्षांचें झालें ह्मणजे लागास येतें. एका झाडापासून दरसाल सुमारें १०० नारळ उत्पन्न होतात. हें झाड ८० पासून १०० वर्षेपर्यंत टिकतें.

नारळापासून खोबरें मिळतें व त्याचें तेलही काढितात. नारळाच्या कवची ( करवंटी ) पासून गरीब लोक तंबाखू ओढण्यास गुडगुडी अगर पाणी पिण्यास बेलें ( भांडें ) तयार करितात. अलीकडे करवंटीपासून गुंड्या तयार करूं लागले आहेत. नारळाच्या सालीपासून काथ्या व त्या काथ्यापासून सुंभ, दोरखंडें, वगैरे वस्तु होतात. सांवळ्या हातरीप्रमाणें विणून त्यांनीं गरीब लोक आपलीं घरें शाकारतात. माडाच्या जून व सरळ खोडाचा उपयोग गरीब लोक घरें बांधण्याकडे करितात. शिवाय ह्या झाडाचा प्रत्येक निकामी भाग सरपण ह्मणून उपयोगीं पडतो. फळ लागण्यापूर्वीं नारळाचा कोंवळा कोंब थोडा चिरून त्यांतून येणारा रस एका मडक्यांत सांठवितात, त्यास 'माडी' ह्मणतात. ताज्या माडीचा व कोंवळ्या नारळांतील पाण्याचा पिण्यास चांगला उपयोग होतो.

# आंब्याचा बाग.

महाराष्ट्रांत आंब्याची लागवड सर्वत्र आहे. आंब्याचे साधारण मानानें तीन वर्ग करितां येतात. ( १ ) रानांत आपोआप होणारे बिनलागवडीचे 'रायवळ आंबे.' ( २ ) मुद्दाम जातवान आंब्याचीं रोपें तयार करून त्यांपासून बनविलेल्या वेगवेगळ्या जातींचे 'इरसाल आंबे'. ( ३ ) कलमें तयार करून त्यांपासून तयार केलेल्या उंची जातींचे 'कलमी आंबे.'

आंब्यांच्या सर्व जातींमध्यें कलमी आंबे श्रेष्ठ होत. रायवळ व इरसाल या जातींचीं झाडें महाराष्ट्रांत सर्वत्र होतात. परंतु कलमी आंबे विशेषतः कोंकणपट्टींत होतात. कोंकणांतील डोंगरावरील बरडी व तांबडी जमीन, उष्ण व सर्द हवा आणि समुद्रावरील खारा वारा ह्या झाडांस उत्तम मानवतो. कोंकणांत कलमी आंब्यांची लागवड दिवसेंदिवस वाढत्या प्रमाणावर आहे. दरसाल शेंकडों रुपयांचे आंबे कोंकणच्या बंदरांतून मुंबईस रवाना होतात. कलमाचीं झाडें उंच वाढत नाहींत, परंतु त्यांचा विस्तार फार असतो. चित्रांत एक कलमाचें झाड दिसत आहे. कलमें करण्याची पद्धति पूर्वीं आपल्या देशांत नव्हती. पोर्तुगीज लोकांनीं सोळाव्या शतकांत गोवें प्रांतांत ती प्रथम सुरू केली असें ह्मणतात. कोंकणांतील कलमी झाडांत 'हापूस' व 'पायरी' ह्या दोन मुख्य जाती आहेत.



२५ कलमी आंब्याचें झाड.



२६ केळीचा बाग व पानमळा.

# केळीचा बाग व पानमळा.

केळीचीं झाडें महाराष्ट्रांत बहुतेक सर्व ठिकाणीं होतात. ह्यांस उष्ण हवा व साधारण सुपीक जमीन लागते. हें झाड साधारणपणें ८।१० फूट उंच वाढतें. झाडाची उत्पत्ति जुन्या झाडाच्या बुंधाशीं कोंब फुटून होते. केळीचें पान सर्व झाडांच्या पानांपेक्षां मोठें असतें, ह्मणून केळीच्या झाडाला पाणी पुष्कळ लागतें. ह्यामुळें पाण्याची सोय जेथें नाहीं तेथें हीं झाडें मुळींच होत नाहींत. इतर झाडांप्रमाणें केळीच्या झाडाचें खोड कणखर व काष्ठमय नसून सोपटाचे एकावर एक थर बसून तें बनलेलें असतें. केळ लावल्यापासून एक वर्षानें केळफूल येतें. हें केळफूल वाढून पुढें त्यापासून सरासरी सहा महिन्यांनीं केळ्यांचें लोंगर तयार होतें. एकदां लोंगर आलें ह्मणजे तें झाड मरून जातें; पण त्याच्या बुंधाशीं कोंब फुटून दुसरें झाड तयार होतें. केळीच्या झाडाच्या प्रत्येक भागाचा उपयोग होतो. केळ्यांत अनेक जाती आहेत. वसईकडील 'राजेळी' नांवाच्या जातीपासून सुकेळीं तयार होतात.

चित्रांत वसई येथील केळीचा बाग दाखविला आहे. बागेंतील झाडांखालीं उभ्या आडव्या काठ्यांचा मांडव घालून त्यावर वेल चढविलेले दिसत आहेत. हा विड्याच्या पानांचा मळा होय. विड्याच्या पानांच्या वेलास 'पानवेल' 'किंवा नागवेल' असें ह्मणतात. तो बारीक असून पुष्कळ लांब वाढतो. हा वेल मांडवावर किंवा लवकर उंच वाढणाऱ्या तुतीच्या अगर पांगाऱ्याच्या झाडावर चढवितात. केळीप्रमाणें ह्यालाही पाणी फार लागतें; ह्मणून त्या दोघांची एके ठिकाणीं लागवड होऊं शकते. पानमळे कोंकणाप्रमाणें देशावरही बऱ्याच ठिकाणीं लावतात.

# मासे धरण्याचा धंदा.

कोंकणपट्टींत समुद्रकिनाऱ्यावर मासे धरण्याचें काम मोठ्या प्रमाणावर चालतें. हा धंदा करणारे लोक मुख्यतः कोळी व खारवी या जातींचे असतात. रत्नागिरी जिल्ह्यांतील हर्णै बंदराजवळ पाज नांवाचें केवळ कोळी लोकांच्याच वस्तीचें एक गांव आहे, तेथील समुद्रकिनाऱ्याचा देखावा चित्रांत दाखविला आहे. समुद्रांत दूर अंतरावर हर्णै येथील सुवर्णदुर्ग किल्ला दिसत आहे. पाज ह्या गांवांतील लोकांचा मुख्य धंदा मासे धरण्याचा आहे.

समुद्रांत मासे धरण्याचें काम मुख्यतः रात्रीच्या वेळीं चालतें. संध्याकाळच्या सुमारास कोळी लोक आपल्या होडयांत जाळीं वगैरे घेऊन समुद्रांत बरेच दूर जातात व रात्रभर समुद्रांत निरनिराळ्या ठिकाणीं हिंडून मासे धरण्याचें काम करितात. मासे धरून आणल्यावर पुरुषांचें काम ह्मटलें ह्मणजे जाळीं धुवून वाळत घालणें इतकेंच असतें. बाकीचीं पुढील कामें, ह्मणजे मासे घरीं नेणें, वाळविणें, खारविणें व बाजारांत नेऊन ते विकणें, हीं कामें बायका व मुलें करितात. चित्रांत कोळ्यांनीं धुतलेलीं जाळीं समुद्रकांठीं उन्हांत आडव्या लाकडावर वाळत आहेत असा देखावा दिसत आहे. हीं जाळीं बरींच मोठीं असतात. पलीकडे पाण्यांत मासे धरणाऱ्या बऱ्याच होडयाही दिसत आहेत. समुद्र हा मनुष्याला मत्स्यरूपानें अन्न पुरवितो. तसेंच त्याच्या अन्नाला चव आणणारें व त्याच्या शरीरास आवश्यक असें मीठही तोच पुरवितो.



२७ मासे धरण्याचा धंदा.

# मिठागरें.

अन्नास प्रामुख्यानें चव आणणारा पदार्थ मीठ होय. त्यानें रक्त शुद्ध होतें व तें शक्तिवर्धकही आहे. लोणचें, मासे वगैरे पदार्थ पुष्कळ दिवस टिकावे म्हणून त्यांत मीठ घालून ठेवितात. मीठ समुद्राच्या पाण्यापासून तयार करितात. समुद्राच्या कांठीं सुमारें हातभर खोल चौकोनी खांचरें चोहोंबाजूस बांध घालून तयार करितात व त्यांत भरतीचे वेळीं समुद्राचें पाणी भरून ठेवितात, किंवा वाफेच्या शक्तीनें चालणाऱ्या पंपांनीं खाडीचें पाणी जरूर तेव्हां आंत भरतात. सूर्याच्या उष्णतेनें हळूहळू पाणी आटून खांचराच्या तळाशीं मिठाचा घट्ट थर जमतो. तो लाकडी पावडयांनीं उकरून त्याचे ढीग घालून ठेवितात. असा मीठ करण्याचा कारखाना ज्या जागीं असतो त्या जागेस **मिठागर** म्हणतात. चित्रांत असें एक मिठागर दिसत आहे. त्यांत अनेक चौकोनी खांचरें असून त्यांत पाणी भरलेलें दिसत आहे. एक मनुष्य बांधावर उभा असून तो खांचरांतील मीठ पावड्यानें बांधावर ओढीत आहे. तयार झालेल्या मिठाच्या पांढऱ्या राशीही चित्रांत मागच्या बाजूस दिसत आहेत.

ठाणें जिल्ह्यांत कुर्ला, वसई, घोडबंदर, भाइंदर वगैरे ठिकाणीं व कुलाबा जिल्ह्यांत उरण, पेण, करंजें, शेव वगैरे गांवीं मिठागरें असून त्यांतून लक्षावधि मण मीठ तयार करण्यांत येतें. रत्नागिरी जिल्ह्यांत फक्त शिरोडें येथें एक मिठागर आहे. हा मीठ तयार करण्याचा धंदा कोंकणांत फक्त उन्हाळ्यांत फार जोरानें चालतो व ह्या धंद्यांत त्यावेळीं पुष्कळ लोक गुंतलेले असतात. मीठ तयार करण्याच्या धंद्याला सरकारी परवाना लागतो व मिठागरांतून विक्री होणाऱ्या मिठाचे भावही सरकारनें ठरविलेले असतात.

# हातमागावरील विणकाम.

वस्त्रें विणण्याची कला महाराष्ट्रांत फार दिवसांपासून आहे. यंत्रांनीं कापड विणण्याच्या गिरण्या सुरू होण्यापूर्वीं हा विणकामाचा धंदा महाराष्ट्रांत खेडोपाडीं पसरला होता व अजूनही खानदेश, नाशिक, नगर, सोलापूर वगैरे जिल्ह्यांत हा जुना धंदा चालू आहे. तेथें कापसापासून सरकी काढणें, कापूस पिंजणें, चरक्यावर सूत काढणें व हातमागावर वस्त्रें विणणें हीं कामें निरनिराळ्या साधनांनीं हातानेंच करितात. चित्रांत एक मनुष्य हातामागावर कापड विणीत आहे असा देखावा दिसत आहे. हल्लीं हातमागावर मुख्यत: स्त्रियांचीं वस्त्रें—लुगडीं, खण—हीं निघतात व त्यांकरितां बहुतकरून गिरणींत निघणारें स्वस्त व सफाईदार सूत उपयोगांत आणितात. कापसाच्या वस्त्राशिवाय येवलें ( नाशिक ) व पुणें या ठिकाणीं रेशमी व जरतारी कापडही तयार होतें. तसेंच हातमागावर सातारा, सोलापूर व नगर ह्या जिल्ह्यांत लोकरीपासून घोंगड्याही तयार करितात. खानदेशांत हातानें काढलेल्या कापसाच्या सुतानें झोन्ये, जाजमें, खादी वगैरे करितात.

अलीकडे वर सांगितलेल्या कापड विणण्याच्या सर्व क्रिया यांत्रिक शक्तीनें मोठ्या प्रमाणावर गिरणींत केल्या जातात. गिरणींतील कापड अल्प श्रमांत व थोडया खर्चांत होऊन सफाईदार होतें व तें बाजारांत स्वस्त दरानें विकलें जातें. म्हणून हातमागावरील विणकामाचा धंदा फायदेशीर होत नसल्यामुळें हळू हळू नाहींसा होऊं लागला आहे. परंतु देशांतील कांहीं पुढारी या जुन्या राष्ट्रीय धंद्याचें महत्त्व लोकांस चांगलें पटवून देऊं लागल्यामुळें या हातमागावरील विणकामाच्या धंद्यास अलीकडे बरीच मान्यता मिळूं लागली आहे.



२९ हातमागाचें विणकाम.



३० खादी छापण्याचें काम.

# खादी छापणें व रंगविणें.

पूर्वी आपल्या देशांत उद्भिज्ज व खनिज द्रव्यांपासून निरनिराळे रंग तयार करीत असत. परंतु अलीकडे परदेशांतून रासायनिक पद्धतीनें तयार केलेले उत्तम व स्वस्त रंग येऊं लागल्यामुळें रंग तयार करण्याचा जुना देशी धंदा बहुतेक बसून गेला व आपले रंगारी सूत व वस्त्रें रंगविण्याचे कामीं परदेशी रंगांचाच उपयोग करूं लागले. तथापि अजूनही कोठें कोठें–विशेषतः खानदेशांत–जुन्या पद्धतीनें खादी रंगविण्याचा धंदा चालू आहे.

प्रथम कोरी खादी नदींत धुऊन रेतींत वाळत घालून तिच्यावर पाणी शिंपडतात. ती वाळल्यावर हिरड्याच्या पाण्यांत कांहीं वेळ भिजत ठेवून पुन्हां तिला उन्हांत वाळवितात. पाणी दिल्यानें रंग तजेल व टिकाऊ बसतो. नंतर त्या खादीवर काळ्या व तांबड्या रंगाचे ठसे मारण्याचें काम चालतें. हिराकस, हिरडे व चिंचोके ह्यांपासून काळा रंग आणि तुरटी, गेरू ( काव ) व चिंचोके ह्यांपासून तांबडा रंग तयार करितात. ह्या दोन्ही रंगांचे खादीवर जरूर तेथें निरनिराळ्या आकृतींचे छाप मारितात. चित्रांत नदीच्या वाळवंटावर चाललेलें खादीवर छाप मारण्याचें काम दाखविलें आहे. छाप मारल्यानंतर रंगानें ओलसर झालेली खादी उन्हांत वाळवितात. ठसे मारून वाळविलेली खादी पुन्हां नदींत धुतात. ह्या धुण्यानें कापड स्वच्छ होऊन पुढें त्यावर रंग चांगला बसतो. नंतर ही खादी मोठमोठ्या पिपांत अगर कढयांत घालून त्यांत रंगाचें पाणी टाकितात व भांड्यांखालीं जाळ करून आंतील खादी सुमारें दीड तास उकळतात. नंतर ती पुन्हां उन्हांत वाळवितात. हें रंगाचें काम चालण्यास उन्हाची आवश्यकता असल्यामुळें हा धंदा पावसाळ्यांत चालत नाहीं.

# सरकी काढणें व गांठी बांधणें.

यंत्रानें कापड विणण्याच्या कारखान्यास गिरणी असें ह्मणतात. ह्या कारखान्याचे मुख्य दोन भाग असतात. एक कच्च्या कापसांतील सरकी यंत्रानें काढून त्याच्या गांठी बांधण्याचा कारखाना व दुसरा ह्या गांठींतील कापसाचें सूत काढून त्याचें कापड विणण्याचा कारखाना. पहिल्या प्रकारच्या कारखान्यास इंग्रजींत 'जिनिंग् अँड् प्रेसिंग् फॅक्टरी' ( सरकी काढणें व गांठी बांधणें ह्यांचा कारखाना ) असें ह्मणतात. दुसऱ्या प्रकारच्या कारखान्यास 'स्पिनिंग् अँड् वीव्हिंग् मिल' ( सूत काढणें व विणणें ह्यांचा कारखाना ) असें ह्मणतात.

चित्रांत पहिल्या प्रकारच्या कारखान्याचा बाहेरून दिसणारा देखावा दाखविला आहे. अशा प्रकारचे कारखाने कापूस पिकणाऱ्या जिल्ह्यांत ठिकठिकाणीं, विशेषतः रेल्वेनजीक, निघाले आहेत. शेतकरी आपल्या शेतांत पिकणारा कापूस गाडींत भरून कारखान्यांत नेतो. तेथें व्यापारी लोक तो कापूस खरेदी करितात. कापूस खरेदी झाल्यावर तो प्रथम सरकी काढण्याच्या कारखान्यांत पाठवितात. तेथें तो यंत्रांत घालून त्यांतून सरकी निराळी करितात. ह्या यंत्रांवर बायका काम करितात. चित्रांत शेतकऱ्यापासून विकत घेतलेल्या कच्च्या कापसाचा ढीग समोर दिसत आहे. मुख्य कारखान्याची इमारत चित्रांत दिसत असून त्याच्या बॉयलरमधील धूर वर नेणारी उंच चिमणीही दिसत आहे. सरकी निघालेला कापूस मोठमोठ्या पोत्यांत भरून गांठी बांधण्याच्या कारखान्यांत नेतात. हा पक्का कापूस प्रेसमध्यें दाबून त्याच्या गांठी तयार करितात. गांठीचें वजन सुमारें पक्के ५ मण असतें. एका प्रेसमध्यें रोज सुमारें १०० गांठी बांधल्या जातात.



३१ सरकी काढण्याचा कारखाना.



३२ गिरणींतील विणकाम.

# गिरणींतील विणकाम.

हिंदुस्तानांत कापड विणण्याच्या गिरण्या प्रथम मुंबईस सुरू झाल्या. परंतु कापूस जेथें पिकतो, त्याच प्रदेशांत ह्या गिरण्या सुरू करणें जास्त फायदेशीर असल्यामुळें, खानदेशांत जळगांव येथें इ० स० १८७४ मध्यें पहिली गिरणी सुरू झाली व सोलापूर येथें १८७७ मध्यें दुसरी गिरणी सुरू झाली. या दोन शहरीं हल्लीं बऱ्याच गिरण्या असून खानदेशांत अमळनेर, चाळिसगांव व धुळें येथेंही कापड विणण्याच्या नवीन गिरण्या सुरू झाल्या आहेत.

गिरण्यांतील सर्व कामें यंत्रांच्या साह्यानें चालतात. सरकी काढलेले कापसाचे गठ्ठे गिरणींत आल्यावर पहिलें काम ह्मणजे त्या कापसांतील सर्व मळ काढून तो पांढरा स्वच्छ करणें व सूत काढण्याकरितां फार बारीक पिंजणें हें होय. मग यंत्रांत घालून त्या कापसाचे पिळे तयार करितात. ह्या पिळ्यांपासूनच निरनिराळ्या नंबरचें ( जाड किंवा बारीक ) सूत काढितात. मागाकरितां सुताचा लांब ताणा तयार करून, माग चालविण्याचें काम यंत्रेंच करितात. अशा प्रकारचे यंत्रांनीं चाललेले पुष्कळ माग चित्रांत दिसत आहेत. प्रत्येक मागाच्या यंत्रांचीं चाकें फिरविण्याकरितां जोडलेले चामड्याचे पट्टेही चित्रांत दिसत आहेत. कापड विणून झाल्यावर त्यास खळ देणें, घड्या घालणें, छाप मारणें व गठ्ठे बांधणें हीं कामें यंत्रांनींच होतात.

# भांडीं करण्याचा कारखाना.

महाराष्ट्रांतील लोक आपल्या घरांत बहुतकरून तांब्यापितळेचीं भांडीं फार वापरतात. हीं भांडीं महाराष्ट्रांत बऱ्याच ठिकाणीं तयार होतात. सांगली, पुणें, नगर, नाशिक वगैरे ठिकाणीं तांब्यापितळेचीं भांडीं मोठ्या प्रमाणावर तयार करण्याचे कारखाने आहेत.

हीं भांडीं मुख्यतः दोन प्रकारचीं असतात. एक घडीव व दुसरी ओतीव. धातूंचे पत्रे ठोकून, त्यांस विशिष्ट आकार आणून व जरूर तर दोन तीन ठिकाणीं जोड देऊन, जीं भांडीं तयार करितात, त्यांस घडीव भांडीं ह्मणतात. घागरी, हांडे, तपेलीं, पातेलीं, पिपें वगैरे मोठीं भांडीं, हीं घडून केलेलीं असतात. अलीकडे हीं भांडीं घडण्याकरितां लागणारे तांब्यापितळेचे पत्रे परदेशाहून इकडे येतात. दोन तांबट कारागीर तपेलीं घडण्याचें काम करीत आहेत व त्यांच्याजवळ कापलेले धातूचे पत्रे पडले आहेत, असा देखावा चित्रांत दिसत आहे. ओतीव भांडीं हीं बहुतकरून पितळेचीं करितात. दिवे, समया, देवांच्या मूर्ति, पूजेचीं लहानलहान भांडीं, हीं ओतून तयार करितात. अलीकडे यांत्रिक दाबानें धातूंच्या पत्र्यापासून वाट्या, डबे, पातेलीं, वगैरे भांडीं बनविण्याच्या कांहीं गिरण्या पुणें येथें निघाल्या आहेत. नाशिक येथेंही चांदीचीं व पितळेचीं भांडीं यांत्रिक साहाय्यानें तयार करूं लागले आहेत.



२२ भांडीं करण्याचा कारखाना.



३४ शेतीचीं औतें करण्याचा कारखाना.

# शेतीचीं औतें करण्याचा कारखाना.

सातारा जिल्ह्यांतील औंध संस्थानांत **किर्लोस्करवाडी** नांवाचें आगगाडीचें स्टेशन आहे. तेथें जवळच शेतीला लागणारीं सर्व प्रकारचीं सुधारलेलीं औतें लोखंडापासून बनविण्याचा एक प्रचंड व नमुनेदार कारखाना आहे. सन १९२० सालीं ह्या कारखान्याचें "लिमिटेड कंपनींत" रूपांतर करण्यांत येऊन बारा लाख रुपये भांडवल जमविण्यांत आलें व आतां इतकें भांडवलही अपुरें झाल्यामुळें तें वाढवून एक कोटी करण्याची योजना नुकतीच झाली आहे. कारखान्यांत तयार होणारीं औतें शेतकऱ्यांस इतकीं प्रिय व फायदेशीर झालीं आहेत कीं, आतांपर्यंत त्या कारखान्यांतील नांगर एक लाखावर खपले आहेत. लोखंडी नांगरांशिवाय उसाचे चरक, बैलरहाट, भुइमुगाच्या शेंगा फोडण्याचीं यंत्रें, पाण्याचे पंप वगैरे शेतकऱ्यांस उपयोगी पडणाऱ्या वस्तूही या कारखान्यांत तयार होतात. नवीन 'ऑइल एंजिन्' तयार करण्याचेही प्रयत्न तेथें यशस्वी झाले आहेत. ह्या कारखान्याचा दुरून दिसणारा देखावा चित्रांत दिसत आहे. सध्यां कारखान्यांत ७०० लोक कामावर आहेत. हे लोक कारखान्याजवळच त्यांच्याकरितां मुद्दाम बांधिलेल्या घरांत राहातात. ह्या लोकांचें आरोग्य, शिक्षण व इतर सुखसोयी, ह्यांकडे पूर्ण लक्ष देण्यांत येतें. किर्लोस्करवाडीमध्यें स्वतंत्र पोस्टऑफीस, मोफत दवाखाना, शालागृह, विजेचा प्रकाश, वाचनालय, छापखाना, क्रीडांगणें, तालीमखाना व नाटकगृह ह्यांची योजना केलेली आहे.

# कांच-कारखाना.

पुणें जिल्ह्यांत **तळेगांव** येथें कांचेचे पदार्थ तयार करण्याचा कारखाना इ.स. १९०८ सालीं प्रथम स्थापन झाला. हा महाराष्ट्रांतील पहिलाच कांच-कारखाना होय. एतद्देशीय द्रव्यांपासून कांच तयार करणें व हिंदी विद्यार्थ्यांस कांचेच्या धंद्याचें शिक्षण देणें, हे या कारखान्याचे मूळ उद्देश असून ते आज बरेच सिद्धीस गेले आहेत. येथील कारखान्यांत कांचेच्या चिमण्या, ग्लोब, बरण्या, हंड्या वगैरे अनेक निरनिराळ्या प्रकारचे पदार्थ उत्तम तयार होतात. त्याचप्रमाणें हे कांचेचे पदार्थ करण्याची कला या कारखान्यांत शिकून पुष्कळ विद्यार्थी तयार झालेले आहेत व त्यांनीं कित्येक नवीन कांच-कारखानेही काढिले आहेत. अशा कारखान्यांपैकींच सातारा जिल्ह्यांतील **ओगलेवाडी** येथील कांच-कारखाना होय. या कारखान्यांत नित्यव्यवहारास लागणारे सर्व प्रकारचे कांचेचे पदार्थ, खेळणीं व इतर अनेक उपयुक्त वस्तु तयार होतात. संपूर्ण हातकंदील यांत्रिक शक्तीनें तयार करण्याचें काम मोठ्या प्रमाणावर नुकतेंच सुरू झालें असून येथें तयार झालेले पूर्ण स्वदेशी कंदील फार लोकप्रिय झाले आहेत.

ओगलेवाडी येथील कांच-कारखान्यांतील कारागीर लोक गार, चुना व सोडा यांपासून तयार केलेला कांचेचा तप्त रस भट्टींतून नळीच्या तोंडावर घेऊन फुंकर मारून चिमण्या तयार करीत आहेत, असा देखावा चित्रांत दाखविला आहे. तयार झालेल्या कित्येक चिमण्याही चित्रांत उजव्या बाजूस दिसत आहेत.



३५ कांच—कारखाना.



२६ कागदाची गिरणी.

# कागदाची गिरणी.

महाराष्ट्रांत कोल्हापूर, जुन्नर ( पुणें ), एरंडोल ( पूर्वखानदेश ), वगैरे ठिकाणीं पूर्वीं हातानें कागद बनविण्याचे कारखाने मोठ्या प्रमाणावर चालत होते. परंतु युरोपांतून यंत्रानें बनविलेले स्वच्छ, सफाईदार व स्वस्त भावाचे कागद इकडे येऊं लागल्यापासून इकडचा कागदाचा धंदा बसून गेला.

महाराष्ट्रांत यांत्रिक पद्धतीनें कागद करण्याची 'डेक्कन पेपर मिल' ह्या नांवाची एक गिरणी पुण्यानजीक मुंढवें या ठिकाणीं आहे. ह्या गिरणीचा आंतील देखावा चित्रांत दिसत आहे. कापूस, लोंकर व ताग ह्यांच्या कापडाच्या चिंध्या, कागदाची रद्दी, ह्यांपासून मुख्यत्वेंकरून चांगला कागद तयार होतो. तसेंच अंबाडीचे दोर, नारळाचा काथ्या, जुनीं दोरखंडें, पेंढा, गवत, लांकडाचा भुसा व बांबू यांपासूनही नानातऱ्हेचे कागद गिरण्यांतून हल्लीं तयार होतात. गिरणींत हा कच्चा माल आणिल्यानंतर त्याचे बारीक तुकडे करितात. ते तुकडे रासायनिक द्रव्यांच्या साहाय्यानें धुऊन स्वच्छ करून त्यांचा रंग घालवितात. पुढें असे तुकडे यंत्रांत घालून त्यांचे अत्यंत बारीक तंतु बनवून त्यांपासून दह्यासारखा पातळ रांधा तयार करितात. हा रांधा एका इंचांत साठ ते सत्तर घरें असणाऱ्या पितळेच्या मोठ्या चाळणीवर पसरतात आणि दाबानें व अन्य कृतीनें त्यांतील पाणी काढितात. अशा प्रकारें घट्ट परंतु ओलसर कागद तयार झाल्यावर तो तापलेल्या रुळांवरून नेऊन पूर्णपणें वाळवितात व शेवटीं दोन रुळांमधून दाबून त्यास सफाईदार बनवितात. चित्रांत रांधा सांठविलेला हौद व तो पसरण्याची मोठी चौकोनी चाळणी दिसत आहेत.

# साखरेचा कारखाना.

हिंदुस्तानांत साखर करण्याचा धंदा फार प्राचीन काळापासून आहे. परंतु आधुनिक सुधारलेल्या पद्धतीनें तयार केलेली साखर परदेशाहून इकडे येऊं लागल्यामुळें व ती देशी साखरेपेक्षां अतिशय मऊ, स्वच्छ आणि स्वस्त असल्यामुळें हिंदुस्तानांतील साखर करण्याचा धंदा बहुतेक बसून गेला आहे.

पुणें जिल्ह्यांत **बारामती** व **मांजरी** व नगर जिल्ह्यांत **बेलापूर** येथें साखरेचे कारखाने आहेत. चित्रांत बेलापूर येथील कारखान्याचा आंतील देखावा दिसत आहे. ऊस कारखान्यांत आणणें, त्याचें वजन करणें, तें वजन कागदावर लिहिणें, ऊस बाहेर उपसणें व तो चरकांत घालणें, हीं सर्व कामें वरील कारखान्यांत यंत्रांनींच होतात. उसाचा रस काढण्याचें व तो आटविण्याचें कामही वाफेनेंच करितात. ह्या कामाकरितां मोठे बॉयलर असतात. उसाचा रस विशिष्ट उष्णतेपर्यंत तापविणें व गंधक आणि चुना यांच्या साहाय्यानें त्यांतील मळी काढणें, ह्या क्रिया अनेक वेळां करून उसाची अगदीं स्वच्छ काकवी तयार करितात. ह्या कामाकरितां विशिष्ट कढयांची योजना केलेली असते. त्यांपैकीं कांहीं चित्रांत अगदीं वरच्या बाजूस दिसत आहेत. येथें कांहीं ठराविक मर्यादेपर्यंत काकवी तापल्यानंतर साखरेचे सूक्ष्म कण तयार होतात. नंतर ते चित्राच्या मध्यभागीं असलेल्या यंत्रांत पडून जोरानें फिरून हलविले जातात व नंतर तेथें त्यांचे मोठे कण बनतात. मग ते चित्राच्या खालच्या बाजूस असलेल्या यंत्रांत पडतात व तेथें त्यांतील सर्व रंग नाहींसा होऊन शुभ्र मऊ साखर बनते. नंतर ती पूर्ण वाळवून व पोत्यांत भरून निरनिराळ्या ठिकाणीं पाठवितात.



२७ साखरेचा कारखाना.



३८ आगपेटीचा कारखाना.

# आगपेटीचा कारखाना.

आगपेटीचे कारखाने आपल्या देशांत निघून फक्त चार पांच वर्षें झालीं. जपान व स्वीडन या दोन देशांतून मुख्यतः आगपेट्या हिंदुस्तानांत येतात. मुंबई इलाख्यांत सध्यां आगपेटीचे १५ निरनिराळे कारखाने सुरू आहेत. त्यांपैकीं महाराष्ट्रांत ठाणें जिल्ह्यांत अंधेरी, सांताक्रूझ व अंबरनाथ येथें तीन आहेत. अंधेरी येथील कारखान्याचा आंतील देखावा चित्रांत दाखविला आहे.

कारखान्यांत प्रथम काड्या व पेट्या करण्यास योग्य असें लाकूड आणल्यानंतर त्याच्या यंत्रावर काड्या तयार करितात. काड्या कापण्याचें यंत्र चित्रांत दिसत आहे. नंतर बऱ्याच काड्या एकत्र बांधून, त्यांचीं एका बाजूचीं टोकें यंत्रानें रासायनिक द्रव्यांत भिजवून वाळवितात. यांत्रिक साहाय्यानें तयार केलेल्या पेट्यांत नंतर काड्या घालून बंद करितात. पेट्यांवर कारखान्याच्या नांवाच्या व खुणांच्या चिठ्ठ्या चिकटवून १२ पेट्यांचा लहान पुडका व बारा पुडक्यांचा मोठा पुडका असे तयार करून बाहेरगांवीं पाठवितात.

परदेशी आगपेट्यांच्या आयातीवर १९२२ सालीं संरक्षक जकात बसविल्यापासून आगपेट्यांचे कारखाने हिंदुस्तानांत निघूं लागले. मुंबई इलाख्यांतील एकंदर १५ कारखान्यांतून हल्लीं दरसाल सुमारें ४० लाख मोठे पुडके तयार होतात. काड्या व पेट्या तयार करण्याकरितां बऱ्याच कारखान्यांत परदेशी लाकूड वापरतात. दरवर्षीं अदमासें ५ लाख रुपयांचें परदेशी लाकूड आगपेट्यांच्या कारखान्यांत येतें.

# आर्यौषधींचा कारखाना, पनवेल. ( कुलाबा )

पनवेल येथील " धूत पापेश्वर आरोग्य मंदिर " नांवाचा आर्यौषधींचा कारखाना रा. कृष्णशास्त्री पुराणिक ह्यांनीं सन १८७८ मध्यें स्थापिला. पुढें त्यांस त्यांचे पुत्र रा. विष्णुशास्त्री हे येऊन मिळाले व त्यांच्या कर्तबगारीनें ह्या कारखान्याची विलक्षण भरभराट होऊन तेथें होणारीं औषधें सर्वत्र लोकप्रिय झालीं.

कारखान्यांतील औषधें मोठ्या प्रमाणावर व अल्पखर्चांत व्हावीं ह्मणून यांत्रिकशक्तीनें तीं तयार करण्याची योजना येथें केली आहे. रसायनें, भस्में, आंसवें, अर्क, चूर्णें वगैरे औषधांचे अनेक प्रकार येथें सुधारलेल्या पद्धतीनें परंतु ग्रंथोक्त पाठाप्रमाणें तयार होतात. चित्रांत कारखान्यांतील अर्कयंत्र दाखविलें आहे. डाव्या बाजूस एक मनुष्य उभा आहे. त्याच्या मागें भट्टी असून तीवर औषधें घातलेलें पात्र आहे. त्या पात्रांतून निघालेली वाफ आडव्या नळींतून मध्यभागीं दिसत असणाऱ्या पिपांतील एका भांड्यांत जाते. पिपांत सतत थंड पाणी ठेवण्याची व्यवस्था केल्यामुळें, ती वाफ भांडयांत थंड होऊन तिचा द्रव बनतो व तो एका नळीवाटे पिपाबाहेर बरणींत पडतो. हाच अर्क होय. चित्रांत मागील बाजूस दिसत असलेल्या मोठमोठ्या पात्रांत आंसवें, तेलें, अरिष्टें, करण्याची योजना केली आहे. या कारखान्यांत तयार झालेलीं औषधें महाराष्ट्रांतील बहुतेक लहान मोठ्या शहरांत विकत मिळतात. या कारखान्याचे हल्लीचे चालक, कै. विष्णुशास्त्री यांचे चिरंजीव रा. गंगाधरपंत हे आहेत. हे चांगले सुशिक्षित असून ते आपले चुलते रा. भाऊसाहेब यांच्या सल्ल्यानें कारखान्याची व्यवस्था पहात असतात.



४० विद्युतशक्ति उत्पन्न करण्याचा करखाना.

# विद्युतशक्ति उत्पन्न करण्याचा कारखाना-खोपोली. (कुलाबा)

बोरघाटांत खंडाळ्यानजीक खोपोली येथील टाटा हैड्रोइलेक्ट्रिक कंपनीचा वीज उत्पन्न करण्याचा कारखाना चित्रांत दाखविला आहे. खंडाळें स्टेशनाजवळ एका मोठ्या टाक्यांत लोणावळ्यानजीक बांधलेल्या तलावांतील पाणी आणून सोडिलें आहे. हें टाकें समुद्रसपाटीपासून २००० फूट उंच आहे. त्यांतील पाणी मोठमोठ्या पोलादी नळांनीं १७५० फूट खोल असणाऱ्या खोपोली येथील कारखान्यांत नेलें आहे. अशा नळांची कारखान्यापर्यंत लांबी सुमारें २½ मैल आहे. चित्रांत हे पाणी आणणारे पांच नळ डोंगरावरून खालीं आलेले दिसत आहेत. मधून मधून उंच कड्यांवर भिंती बांधून नळांस नेट दिला आहे. १७५० फूट उंचीवरून नळांतून येणारें पाणी कारखान्यांतील प्रचंड चाकांवर पडतें व तीं चाकें पाण्याच्या भयंकर शक्तीनें अतिशय वेगानें फिरूं लागतात. चाकें फिरूं लागलीं ह्मणजे त्यांस जोडलेलीं डायनामो नांवाचीं यंत्रेंही फिरूं लागतात व त्यांपासून मग वीज उत्पन्न होते. ह्या कारखान्यांत उत्पन्न झालेली वीज तांब्याच्या तारांतून ४३ मैल अंतरावर मुंबईस नेली आहे. अशा विजेच्या तारांचा खांब चित्रांत डाव्या बाजूस दिसत आहे. हल्लीं मुंबईस ह्या विजेच्या शक्तीनें सुमारें साठ कापडाच्या गिरण्या चालत आहेत.

# निर्यात माल.

महाराष्ट्रांतील निरनिराळ्या जिल्ह्यांतून कोणता माल बाहेर जातो हें नकाशांत चित्रांनीं दाखविलें आहे. ठाणें, कुलाबा, नाशिक व पुणें ह्या जिल्ह्यांत भाताचें उत्पन्न बरेंच होत असल्यामुळें तेथून तांदूळ बाहेर जातो. सोलापूर व खानदेश ह्या जिल्ह्यांतून ज्वारी, सरकी, कापसाच्या गांठी व गिरणीचें कापड हे जिन्नस रवाना होतात. मुंबई व ठाणें येथूनही गिरणीचें कापड बाहेर पाठवितात. हातमागावरील लुगडीं व रेशमी कापड नगर व नाशिक ह्या जिल्ह्यांतून बाहेर जातें. खानदेशांत चारा व सरकी ह्यांची विपुलता असल्यामुळें तेथून तूप व लोणी मुंबईस रवाना होतें. पुणें व नगर ह्या जिल्ह्यांत ऊस फार पिकत असल्यामुळें तेथून गूळ व साखर बाहेर पाठवितात. पुणें व नाशिक येथून भाजी व फळफळावळ, तसेंच तांब्यापितळेचीं भांडीं, बाहेर जातात. सातारा जिल्ह्यांतून गूळ, हळद, तंबाखू, भुइमूग, वगैरे जिन्नस घाटांतून कोंकणांतील जिल्ह्यांत रवाना होतात. ठाणें, कुलाबा व रत्नागिरी या जिल्ह्यांतील मिठागरांतून मीठ बाहेर पाठवितात. कोंकणांतील समुद्रकांठच्या प्रदेशांतून मासळी बाहेर पाठविली जाते. सुपारी, नारळ, हिरडा, कलमी आंबे, काजू, हा रत्नागिरी जिल्ह्यांतील निर्यात माल होय. ह्याशिवाय महाराष्ट्रांतील कांहीं ठिकाणीं शेतीचीं औतें, कांच, कागद, आगपेटी, वगैरे जिन्नस तयार करण्याचे जे यांत्रिक कारखाने निघाले आहेत, त्यांमध्यें तयार होणारे जिन्नस त्या त्या ठिकाणांहून बाहेर रवाना होतात.



निर्यात माल.
साग
कापूस
जळगांव
कापड
धुळें
लोणी
भांडीं
नाशिक
द्राक्षें
लुगडीं
सालाकूड
मीठ
गूळ
ठाणें
बटाटे
नगर
भांडीं
मुंबई
तांदूळ
अलिबाग
गूळ
पुणें
मुसंबें
संत्रीं
साखर
मीठ
तंबाकू
सोलापूर
कापड
ज्वारी
सातारा
भुयमूग
रत्नागिरी
नारळ
मासे


४१ निर्यात माल.


रस्ते.
आग्र्याकडे
एदलाबाद
जळगांव
धुळें
मनमाड
बलसाडकडे
नाशिक
औरंगाबादकडे
ठाणें
नगर
मुंबई
पुणें
अलिबाग
सोलापूर
अक्कलकोट कडे
सातारा
रत्नागिरी
मिरजेकडे
कोल्हापूर

४२ मुख्य रस्ते.

# मुख्य रस्ते.

महाराष्ट्रांतील मुख्य रस्ते नकाशांत दाखविले आहेत. पुणें शहर हें महाराष्ट्राची राजधानी असून मध्यवर्ति असल्यामुळें तें शहर सडकांचें केंद्र बनलें आहे, असें नकाशांत दिसून येईल. तेथून मुंबई, ठाणें, सातारा, सोलापूर, नगर, नाशिक, ह्या मुख्य शहरीं सडका नेल्या आहेत. तसेंच मुंबईहून उत्तर हिंदुस्तानांत आग्रा शहराकडे जाणारा रस्ता ठाणें, नाशिक व धुळें शहरांवरून उत्तरेकडे गेला आहे. प. खानदेशांतील धुळें शहरापासून पूर्वखानदेशांत जळगांवाकडे एक सडक गेली आहे. देशावरील प्रदेश साधारणपणें सपाट असल्यामुळें तेथें सडकांचें जाळेंच बनलें आहे.

कोकणांत व विशेषतः रत्नागिरी जिल्ह्यांत सडका फार थोडया आहेत. ह्याचें कारण तेथील विशिष्ट भूपृष्ठरचना हें होय. कोंकणांतील ठाणें, कुलाबा व रत्नागिरी ह्या जिल्ह्यांतून नाशिक, पुणें, सातारा, ह्या जिल्ह्यांत सह्याद्रीमधून कांहीं सडका नेल्या आहेत, त्यांस **घाट** असें ह्मणतात. ठाणें जिल्ह्यांतील **थळघाट**, कुलाबा जिल्ह्यांतील **बोरघाट** व रत्नागिरी जिल्ह्यांतील **आंबा** व **कुंभार्लीं घाट** हे विशेष प्रसिद्ध आहेत. जेव्हां आगबोटी व आगगाडया नव्हत्या तेव्हां कोंकण व देश ह्यांमधील दळणवळण व व्यापार ह्या घाटरस्त्यांनींच होत असे. परंतु आगगाडीचा विस्तार चोहोंकडे झाल्यावर ह्या घाटरस्त्यांवरील दळणवळण कमी होत गेलें. परंतु अलीकडे मोटारगाडयांची वाहातूक सर्वत्र झपाट्यानें वाढत असल्यामुळें ह्या रस्त्यांवरील दळणवळण पुनः सुरू झालें असून ह्या रस्त्यांना पुनः महत्त्व प्राप्त झालें आहे.

# घाटांतील रस्ता.

कोंकण व देश ह्यांमध्यें सात आठ मैल रुंदीच्या सह्याद्रीच्या रांगा पसरल्या आहेत. कोंकणांतून देशावर यावयाचें ह्मणजे सरासरी दोन हजार फूट चढाव चढणें भाग पडतें. परंतु सडकेच्या रस्त्यास फार चढाव असेल तर बैलगाडी वर चढणें व खालीं उतरणें धोक्याचें व कष्टाचें काम होतें; ह्मणून सह्याद्रींतून सडक बांधतांना बेताचा चढाव यावा याकरितां डोंगराच्या वळणांवळणांनीं थोडथोडा चढाव घेत घेत सडक न्यावी लागते; ह्यामुळें तिची लांबी बरीच वाढते. डोंगरांतून नेलेल्या सडकेस **घाट** असें ह्मणतात. अशा एका घाटाचा कांहीं भाग चित्रांत दिसत आहे. एका बाजूस उंच कडा व दुसरे बाजूस खोल दरी ह्यांच्यामधून सडक नेली आहे. घाट बांधणें किती खर्चाचें व कौशल्याचें काम आहे हें चित्रावरून दिसून येईल.

पुणें व मुंबई ह्यांमधील बोरघाट इ. स. १८४० मध्यें तयार झाला. तसेंच मुंबई-आग्रा रस्त्यावरील थळघाट इ. स. १८५८ मध्यें तयार झाला. ह्यांशिवाय कऱ्हाडपासून चिपळूणच्या रस्त्यावर कुंभार्ली घाट, महाबळेश्वरापासून महाडच्या रस्त्यावर पारघाट, महाडापासून भोर-पुणें रस्त्यावर वरंध्याघाट, कोल्हापूर ते रत्नागिरी या रस्त्यावर आंबा-घाट, कोल्हापूर ते मालवणच्या रस्त्यावर फोंडाघाट व बेळगांव ते वेंगुर्ल्याच्या रस्त्यावर आंबोलीघाट हे महाराष्ट्रांतील मुख्य घाट होत. यांशिवाय सातारा जिल्ह्यांतील पसरणीचा व रडतोंडीचा घाट, पुणें जिल्ह्यांतील कात्रजचा व खांबटकीचा घाट, प. खानदेशांतील गवळण घाट व पू. खानदेशांतील आउट्रॅम घाट हे इतर लहान घाट आहेत.


आगगाडीचे मार्ग.
भुसावळ
अंमळनेर
जळगांव
नवापूर
धुळे
चाळिसगांव
मनमाड
नाशिक
उंबरगांव
ठाणें
कल्याण
नगर
मुंबई
अलिबाग
पुणें
दौंड
बार्शी
कुर्डुवाडी
सोलापूर
पंढरपूर
सातारा
रत्नागिरी
मिरज

४४ आगगाडीचे रस्ते.

# आगगाडीचे रस्ते.

चित्रांत महाराष्ट्रांतील आगगाडीचे रस्ते दाखविले आहेत. महाराष्ट्रांत आगगाडीचा रस्ता प्रथम मुंबई व ठाणें ह्यांमध्यें ता० १८ एप्रील सन १८५३ रोजीं सुरू झाला. हाच हिंदुस्तानांतील पहिला आगगाडीचा रस्ता होय. आज महाराष्ट्रांत ज्या रेल्वे कंपन्या आहेत, त्यांत **जी० आय्० पी०** ( ग्रेट इंडियन पेनिन्शुला ) **रेल्वे** कंपनी प्रमुख होय. हिचे रस्ते रत्नागिरी व सातारा या जिल्ह्यांशिवाय सर्व जिल्ह्यांतून गेलेले आहेत. हिचा एक मुख्य रस्ता मुंबईहून निघून ठाणें, नाशिक व पूर्वखानदेश ह्या जिल्ह्यांतून गेला आहे. दुसरा मुख्य रस्ता कल्याणपासून निघून कुलाबा, पुणें व सोलापूर ह्या जिल्ह्यांतून गेला आहे. हे दोन मुख्य रस्ते अनुक्रमें सह्याद्रींतील थळघाट व बोरघाट ह्यांतून नेले आहेत. ह्या मुख्य रस्त्यांशिवाय दौंड—मनमाड, दौंड—बारामती, चाळीसगांव—धुळें, जळगांव—अमळनेर, पाचोरें—जामनेर, हे त्यांस जोडलेले दुसरे फाटे आहेत. महाराष्ट्रांतील दुसरी महत्त्वाची रेल्वे कंपनी **बी० बी० अँड् सी० आय्०** ही होय. हिचा रस्ता मुंबईहून निघून ठाणें जिल्ह्याच्या पश्चिम भागांतून थेट उत्तरेकडे गुजराथेंत गेला आहे. तिसरी कंपनी **मद्रास अँड् सदर्न मराठा रेल्वे** कंपनी होय. हिचा रस्ता पुण्याहून निघून सातारा जिल्ह्यांतून थेट दक्षिणेकडे कर्नाटकांत गेला आहे. महाराष्ट्रांतील आणखी एक आगगाडीचा रस्ता पूर्वखानदेशांत अमळनेर येथें सुरू होऊन तो पश्चिमखानदेशांतून थेट पश्चिमेस सुरतेपर्यंत जातो. ह्याला **तापी व्हॅली रेल्वे** ह्मणतात. **बार्शी लाईट रेल्वेचा** रस्ता सोलापूर जिल्ह्यांतून जी० आय्० पी० रेल्वेस कुर्डूवाडी येथें छेदून उत्तरेस बार्शीकडे व दक्षिणेस पंढरपुराहून मिरजेपर्यंत गेला आहे.

# आगगाडीचा पूल.

आगगाडीचा रस्ता बांधतांना मध्यें मोठ्या नद्या आल्यास त्यांवर फार मजबूत पूल बांधावे लागतात. असे पूल महाराष्ट्रांत पुष्कळ आहेत. त्यांमध्यें ठाणें जिल्ह्यांत वसईच्या खाडीवर जो पूल बांधला आहे, त्याच्या इतका मोठा पूल महाराष्ट्रांत दुसरा नाहीं. ह्या पुलाचा एक भाग चित्रांत दिसत आहे. बी० बी० अँड् सी० आय्० रेल्वे ठाणें जिल्ह्यांतील लहान मोठ्या अनेक खाड्यांवरून गेली आहे. त्यांपैकीं वसई येथील खाडी फारच मोठी आहे. वसईजवळ खाडीच्या पात्रांत पांजू नांवाचें एक लहानसें बेट आहे; त्यामुळें खाडीचे उत्तरेकडील प्रवाह व दक्षिणेकडील प्रवाह असे दोन भाग झाले आहेत. ह्या दोन्ही प्रवाहांवर दोन पूल बांधिले असून त्यांचा संयोग खाडींतील पांजू बेटावर केला आहे. दक्षिणेकडील व उत्तरेकडील पुलांची लांबी अनुक्रमें ४३१२ व १५५२ फूट आहे. पुलांचें सर्व बांधकाम लोखंडी आहे. मोठ्या पुलास ६९ कमानी असून लहान पुलास २५ आहेत. ह्या पुलांवरून आगगाडीचा दुहेरी रस्ता नेला असून शिवाय बाजूस मनुष्यास जाण्यायेण्याकरितां एक पायवाट ठेविली आहे. ह्या खाडीच्या दक्षिणेस भाइंदर स्टेशन व उत्तरेस वसई स्टेशन आहे. चित्रांत दक्षिणेकडील पुलाचा देखावा दिसत असून पुलावरून आगगाडी वसईहून भाइंदरकडे जात आहे, असें दाखविलें आहे. हा पूल इ० स० १८६४ सालीं सुरू झाला. तो आतां बराच जुना झाल्यामुळें रेल्वे कंपनीनें ह्या पुलाच्या पूर्व बाजूस १२० फुटांवर एक नवीन पूल बांधिला आहे.



४५ आगगाडीचा पूल.




४६ आगगाडीचा बोगदा.






# आगगाडीचा बोगदा.

कोंकण व देश ह्यांच्यामध्यें पसरलेल्या सह्याद्रीच्या रांगेंतून आगगाडीचे रस्ते बांधतांना कित्येक ठिकाणीं विशाल व भयंकर दऱ्यांवरून पूल बांधावे लागले व कित्येक ठिकाणीं मध्यें उंच डोंगर आडवा आल्यामुळें तो पोखरून त्याच्या पोटांतून वाट काढावी लागली. ह्या पोखरलेल्या वाटेसच 'बोगदा' असें ह्मणतात. थळघाटांतील आगगाडीच्या रस्त्यावर एकंदर २४ व बोरघाटांत २६ बोगदे आहेत. हीं सर्व बोगद्याचीं कामें प्रचंड असून फार कौशल्याचीं आहेत. सह्याद्रींतील बहुतेक बोगदे डोंगरांतील काळ्या खडकांतून कोरले आहेत. परंतु ज्या ठिकाणीं असा कठीण खडक लागला नाहीं, त्या ठिकाणीं आंतून दगडाच्या कमानी बांधून काम केलें आहे. बोगद्यांत काळोख असल्यामुळें आंतून गाडी जातांना दिवसा गाडींत दिवे लावावे लागतात. थळघाटांतील व बोरघाटांतील बोगद्यांशिवाय ठाणें ते कल्याण रस्त्यावर पारसीक स्टेशनाजवळही दोन बोगदे कोरले आहेत. एक १०३ यार्ड व दुसरा ११५ यार्ड लांबीचा आहे. ह्या दोन बोगद्यांजवळील रस्त्याचें वाकण टाळण्याकरितां ह्याच टेकडींत दुसरीकडे पूर्वबाजूला एकच नवीन मोठा बोगदा केला आहे. चित्रांत पारसीक येथील नवीन बोगद्याचें एक तोंड दाखविलें आहे. बोगद्याच्या तोंडाचा भाग दगडी कमानीनें बांधून काढिला आहे. आगगाडी बोगद्यांत शिरली आहे असा देखावा चित्रांत दिसत आहे. या बोगद्याची लांबी सुमारें एक मैल आहे.

# रिव्हर्सिंग स्टेशन.

बोरघाटांतील रिव्हर्सिंग स्टेशनचा देखावा चित्रांत दाखविला आहे. घाटांतील आगगाडीचा रस्ता डोंगराच्या उतरणीच्या बाजूनें, दऱ्यांवरून, बोगद्यांतून व लहान डोंगरांच्या माथ्यांवरूनही नेतात. परंतु बोरघाटांत चित्रांत दाखविलेलें जें रिव्हर्सिंग स्टेशन आहे, त्या ठिकाणीं एका बाजूस उंच पर्वत असून पुढें कडा तुटून खोल दरी झाली आहे; त्यामुळें पुढें त्याच दिशेनें रस्ता नेण्यास सोय नाहीं. ह्मणून ह्या ठिकाणीं रस्ता उलट दिशेनें बांधून नेला आहे. येथें गाडी उलट मागें जाते, ह्मणून त्यास 'रिव्हर्सिंग' स्टेशन ह्मणतात. चित्रांत डाव्या बाजूस उंच कडा व मध्यें एकाखालीं एक असे दोन रस्ते दिसत आहेत. डाव्या हाताकडील रस्त्यावरून गाडी पुढें जात आहे. गाडी ह्या रस्त्याच्या टोंकावर गेल्यावर एंजिन सोडून गाडीच्या मागच्या बाजूस लावतात व मग गाडी खालच्या रस्त्यावर येते.

थळघाटांत आगगाडीचा रस्ता बांधतांना अशाच प्रकारचें एक रिव्हर्सिंग स्टेशन प्रथम करावें लागलें होतें. परंतु तो रस्ता फार वाकणाचा असल्यामुळें व रिव्हर्सिंग स्टेशनाजवळ एंजिन सोडून लावण्यास फार वेळ मोडत असल्यामुळें कांहीं वर्षांपूर्वीं त्या रस्त्याचा कांहीं भाग नवा बांधून रिव्हर्सिंग स्टेशन टाळलें आहे. त्याचप्रमाणें बोरघाटांतीलही रिव्हर्सिंग स्टेशन टाळतां यावें, म्हणून नवीन रस्ता बांधण्याचें काम सध्यां चालू आहे.



४७ रिव्हर्सिंग स्टेशन.


जलमार्ग.
जळगांव
धुळें
नाशिक
वसई
ठाणें
नगर
मुंबई
अलिबाग
पुणें
बाणकोट
हर्णै
सोलापूर
दाभोळ
सातारा
जयगड
रत्नागिरी
जैतापूर
विजयदुर्ग
देवगड
मालवण
वेंगुर्लें

४८ जलमार्ग.

# जलमार्ग.

कोंकणांतील बंदरांमध्यें आगबोटी व गलबतें ह्यांच्या साहाय्यानें वर्षांतील आठ नऊ महिने जलमार्गानें दळणवळण चालतें. नकाशांत हे जलमार्ग व प्रमुख बंदरें दाखविलीं आहेत. ह्या दळणवळणाचें मुख्य केंद्र मुंबई बंदर होय. तेथून दक्षिणेकडे कुलाबा व रत्नागिरी ह्या जिल्ह्यांतील बंदरांत जाण्याकरितां आगबोटी व जहाजें सुटतात. ह्या दोन जिल्ह्यांत आगगाडीचे रस्ते नसल्यामुळें त्यांतील लोकांना मुंबईशीं व तेथून महाराष्ट्रांतील इतर भागांशीं दळणवळण व व्यापार चालू ठेवण्यास जलमार्गाचा व बंदरांचा उपयोग करावा लागतो. ठाणें जिल्ह्यांत दमण, संजाण, वसई, भिवंडी, कल्याण; कुलाबा जिल्ह्यांत उलवा, धरमतर, अलिबाग, रेवदंडा, श्रीवर्धन, जंजिरा; व रत्नागिरी जिल्ह्यांत बाणकोट, हर्णै, दाभोळ, जयगड, रत्नागिरी, विजयदुर्ग, मालवण, वेंगुर्लें; हीं कोंकणांतील मोठीं बंदरें आहेत.

जलमार्गाचा दुसरा भाग खाडया ह्या होत. ठाणें जिल्ह्यांत संजाणची, दांतिवऱ्याची व वसईची खाडी; कुलाबा जिल्ह्यांत पनवेलची, धरमतरची व रोह्याची खाडी; व रत्नागिरी जिल्ह्यांत बाणकोटची, दाभोळची, जयगडची, जैतापूरची, विजयदुर्गची, आंचऱ्याची, कालावलीची, करलीची व तेरेखोलची खाडी; या कोंकणांतील मुख्य खाडया आहेत. त्यांतून गलबतें व लहान आगबोटी ह्यांनीं व्यापार व दळणवळण चालतें. कोंकणची जमीन फार डोंगराळ व नद्या आणि खाडया ह्यांनीं तुटलेली असल्यामुळें तेथें देशाप्रमाणें मोठमोठ्या सडका करणें शक्य नाहीं; अशा स्थितींत ह्या खाडयांनीं तेथें व्यापारास व दळणवळणास फार मदत केली आहे.

# आगबोट.

कोंकणांतील किनाऱ्यावरील बंदरांशीं दळणवळण करणारी व समुद्रांतून उतारूंची ने आण करणारी एक आगबोट चित्रांत दाखविली आहे. या आगबोटीची लांबी, रुंदी व उंची अनुक्रमें २२५,३०, व २५ फूट असते. समुद्रकिनाऱ्यावरील बंदराजवळ पाणी फार उथळ असल्यामुळें आगबोटी तेथें जाऊं शकत नाहींत. ह्मणून उतारू लोकांचे सोयीसाठीं समुद्रांत दगडाचे भक्कम धक्के बांधितात. ह्या धक्क्यांना आगबोटी लागतात व मग आगबोटींत चढण्याचें व तेथून खालीं उतरण्याचें काम सोपें होतें. परंतु कोकणांतील बहुतेक बंदरांना आगबोट उभी करण्यास दगडाचा पक्का धक्का नाहीं. ह्मणून आगबोट बंदराजवळ गेली ह्मणजे कांहीं अंतरावर खोल पाण्यांत उभी करितात. चित्रांत आगबोट बंदराजवळ येऊन उभी राहिलेली दिसत आहे. आगबोट बंदराजवळ थांबली ह्मणजे किनाऱ्यावरून उतारू घेऊन मोठमोठे मचवे ( पडाव ) आगबोटीजवळ येतात. नंतर त्यांतील उतारू प्रथम आगबोटीवरील शिडीवरून वर चढतात व मचवा रिकामा झाला ह्मणजे त्या बंदरांत उतरणारे प्रवासी आगबोटींतून त्याच शिडीवरून मचव्यांत खालीं उतरतात. चित्रांतील मचव्यांत आगबोटीवरील उतारू उतरतांना दिसत आहेत. नंतर ते उतारू घेऊन मचवे किनाऱ्यावर जातात. शिवाय सरकारी कस्टमखात्यांतील अधिकारी आगबोटीची तपासणी करण्यासाठीं एका लहानशा होडींत बसून आगबोटीवर जातो. चित्रांत अशा अधिकाऱ्याची होडी आगबोटीच्या मागच्या बाजूस लागलेली दिसत आहे. कोंकणकिनाऱ्यावरील टपालही आगबोटींतूनच जातें. पावसाळ्यांत समुद्रांत फार वारा असल्यामुळें तीन साडेतीन महिने आगबोटी बंद असतात. ह्या आगबोटींचा वेग दरताशीं सुमारें बारा मैल असतो.


बाहेरील आंकडे जिल्ह्याचें क्षेत्रफळ व
आंतील आंकडे जिल्ह्याची दर चौ० मैलीं
लोकसंख्या दाखवितात
धुळें
जळगांव
नाशिक
नगर
पुणें
सोलापूर
अलिबाग
रत्नागिरी
सातारा २२५
नगर १६३
लोकसंख्या.
दर चौ० मै० २५० ते ३००
" " " २०० ते २५०
" " " १५० ते २००
" " " १०० ते १५०

५० लोकवस्ती.

# लोकवस्ती.

महाराष्ट्रांतील निरनिराळ्या जिल्ह्यांतील लोकवस्तीच्या दाटीचें प्रमाण नकाशांत दाखविलें आहे. नकाशाच्या खालीं डाव्या बाजूस त्यांतील रंगांचें स्पष्टीकरण देणारे अंक लिहिले आहेत. शिवाय सर्व जिल्ह्यांतील क्षेत्रफळांचें व लोकसंख्येचें प्रमाण वर्तुलखंडांनीं दाखवून प्रत्येक जिल्ह्यांत दर चौरस मैलास किती लोक राहतात हेंही दाखविलें आहे.

लोकसंख्येच्या दाटीच्या दृष्टीनें उतरता असा महाराष्ट्रांतील जिल्ह्यांचा क्रम लाविला तर तो रत्नागिरी, कुलाबा, ठाणें, पूर्वखानदेश, सातारा, पुणें, सोलापूर, नाशिक, अहमदनगर व पश्चिमखानदेश असा लागतो. देशांतील जिल्ह्यांपेक्षां कोंकणांत लोकवस्ती जास्त दाट आहे व त्यांतही जसजसें उत्तरेकडून दक्षिणेकडे जावें तसतशी लोकसंख्या अधिक दाट होत गेली आहे. कोंकणांतील जिल्ह्यांचें क्षेत्रफळ फार कमी आणि तेथें पाऊस भरपूर व नियमित पडतो, ह्यामुळें दुष्काळ पडण्याचा संभव कमी असतो. यामुळें तेथें वस्ती दाट आहे. देशावरील जिल्ह्यांचें क्षेत्रफळ फार मोठें, पाऊस अनिश्चित, वारंवार दुष्काळ, ह्मणून लोकसंख्या विरळ आहे. लोकसंख्या सर्वांत जास्त विरळ असणारे अहमदनगर व पश्चिमखानदेश हे जिल्हे आहेत. अहमदनगर जिल्ह्यांत पाऊस फारच अनियमित ह्मणून दुष्काळ वारंवार पडतो व पश्चिमखानदेशाचा बहुतेक उत्तर व पश्चिमभाग अतिशय डोंगराळ, नापीक व वाईट हवेचा आहे, म्हणून तेथें लोकवस्ती फार विरळ आहे.

# भाग दुसरा.

## प्रसिद्ध ऐतिहासिक स्थळें.

महाराष्ट्राच्या इतिहासांतील कांहीं प्रसिद्ध स्थळें नकाशांत दाखविलीं आहेत. महाराष्ट्राच्या अर्वाचीन इतिहासामध्यें मुसलमानी अंमल, मराठ्यांचा अंमल व इंग्रजी अंमल यांचा समावेश होतो. मुसलमानी कारकीर्दींत घडलेल्या अनेक ऐतिहासिक प्रसंगांचीं स्मारकें महाराष्ट्रांत दिसून येतात. त्याचप्रमाणें मराठेशाहीच्या स्थापनेची व वैभवाची आठवण करून देणारीं अशीं स्थळें महाराष्ट्रांत पुष्कळ आहेत. मराठी अंमलाची अखेर व ब्रिटिश कारकीर्दीचा उदय यांच्या संधिकालांत घडलेल्या ऐतिहासिक गोष्टींची साक्ष देणारीं स्थळेंही अनेक दिसतात. महाराष्ट्रांत अशा प्रकारचीं ऐतिहासिक महत्त्वाचीं अनेक स्थळें आहेत. परंतु त्यांमध्यें जी विशेष प्रसिद्ध आहेत अशा कांहीं स्थळांचें सचित्र वर्णन पुढें दिलें आहे.

ह्या स्थळांचे प्रवासाच्या दृष्टीनें स्थानपरत्वें मुख्य तीन विभाग होतात. पहिल्या विभागांत कोल्हापूर, पन्हाळा, सातारा, कऱ्हाड, प्रतापगड, रायगड, पुणें, शिवनेरी, तोरणा, पुरंदर, सिंहगड वगैरे सह्याद्रीच्या भागांतील स्थळें येतात. दुसऱ्या विभागांत पूर्वेकडील सोलापूर, खर्डें, अहमदनगर, कोपरगांव, मालेगांव, थाळनेर वगैरे देशावरील सपाट प्रदेशांतील स्थळें येतात. तिसऱ्या विभागांत कोंकणपट्टींतील वसई, अलिबाग, जंजिरा, राजापूर, विजयदुर्ग, सिंधुदुर्ग, वेंगुर्लें वगैरे स्थळें येतात. या सर्व स्थळांचीं चित्रें पाहून व त्यांसंबंधीं माहिती वाचून इतिहासाचा अभ्यास करतांना बरीच मदत होईल व महाराष्ट्राचा इतिहास अधिक मनोरंजक व मूर्तस्वरूपाचा वाटेल अशी आशा आहे.




५१ प्रसिद्ध ऐतिहासिक स्थळें.



५२ जुना राजवाडा—कोल्हापूर.

# जुना राजवाडा—कोल्हापूर.

कोल्हापूर येथील जुना राजवाडा शहराच्या मध्यभागीं असून तो अत्यंत विस्तीर्ण व भव्य असा आहे. त्याचा पूर्वेकडून दिसणारा देखावा चित्रांत दिसत आहे. वाड्यांत प्रवेश करण्याचा मुख्य दरवाजा उत्तरेच्या बाजूस असून त्यावर नगारखान्याची उंच इमारत आहे. तिच्या वरच्या भागावरून शहराचा देखावा फार उत्तम दिसतो. चित्रांत वाड्याचा मुख्य दरवाजा व नगारखान्याची उंच इमारत उजव्या बाजूस दिसत आहे. नगारखान्याच्या इमारतीच्या वरच्या बाजूस मराठ्यांचें निशाण (भगवा झेंडा) फडकत असतें. मुख्य वाड्याचा दुमजली भाग चित्रांत डाव्या बाजूस दिसत आहे. वाडयाला १८ चौक आहेत. हल्लीं या वाड्यांत महाराजांच्या खासगी खात्याकडील कचेऱ्या आहेत. वाडयांत शिरल्यावर प्रथम विस्तीर्ण सभामंडप लागतो. त्यांत संक्रांत, वर्षप्रतिपदा, दसरा वगैरे प्रसंगीं सरकारी दरबार भरत असतात. या दरबारांचा सर्व थाट देशी पद्धतीचा असतो. या मंडपाच्या मागच्या बाजूस सरकारी देवघर असून त्यांत भोसल्यांची कुलदेवता तुळजापूरची भवानी देवी हिची स्थापना केलेली आहे. देवीची मूर्ति सुवर्णाची असून देवळावरील शिखरही सोनेरी आहे. राजवाडयाच्या निरनिराळ्या भागांत सरकारी कचेऱ्या, खजिना, फरासखाना व हत्यारखाना हीं आहेत. हत्यारखान्यांत जुन्या प्रकारच्या सर्व हत्यारांचा संग्रह केलेला असून तो पाहण्यासारखा आहे.

# पन्हाळगड.

पन्हाळगड हा इतिहासप्रसिद्ध डोंगरी किल्ला कोल्हापूर शहराच्या वायव्येस १२ मैलांवर आहे. किल्ल्याचा दुरून दिसणारा देखावा चित्रांत दिसत आहे. किल्ल्याचा घेर ४½ मैल असून त्याची उंची समुद्रसपाटीपासून सुमारें २७०० फूट आहे. किल्ल्याची तटबंदी फार मजबूत आहे. किल्ल्यांत जाण्यास तीन दरवाजे आहेत. पैकीं एक दरवाजा हल्लीं चांगल्या स्थितींत आहे. या किल्ल्यावर मुबलक पाणी, सुपीक जमीन व दाट झाडी असल्यामुळें शत्रूनें वेढा घातला तरी अन्नपाणी व सरपण यांचा तुटवडा भासत नसे व त्यामुळें किल्ला बरेच दिवस लढवितां येई.

हा किल्ला फार जुना असून इ. स. ११९०च्या सुमारास शिलाहार वंशांतील दुसऱ्या भोज राजानें बांधिला व इ. स. १२०८च्या सुमारास यादव वंशांतील सिंगण राजानें मजबूत केला. पुढें मुसलमान बादशहांनीं या किल्ल्याची तटबंदी केली. शिवाजीनें अफजुलखानाचे वधानंतर सन १६५९त हा किल्ला विजापूरकरांकडून जिंकून घेतला. परंतु पुढल्याच वर्षीं विजापूरचा प्रसिद्ध सरदार शिदीजोहार यानें पन्हाळ्यास अकस्मात् वेढा दिला व अल्लीअदिलशाहानें किल्ला सर केला. पण त्यापूर्वींच शिवाजी तेथून निसटून पन्हाळ्याच्या वायव्येस ३५ मैलांवर असणाऱ्या विशाळगड किल्ल्यांत गेला व त्या प्रसंगीं प्रसिद्ध पावनखिंडीचें युद्ध होऊन बाजी देशपांडे यानें मोठा पराक्रम करून लढत असतांना आपला प्राण सोडला. ह्यापुढें मुसलमान व मराठे ह्यांच्यांत ह्या किल्ल्याचे स्वामित्वाकरितां अनेक झटापटी झाल्या. शेवटीं सन १७०९ मध्यें राजारामाची बायको ताराबाई हिचे ताब्यांत हा किल्ला आला व तेव्हांपासून आतांपर्यंत तो ताराबाईच्या वंशजांच्या ( कोल्हापूरच्या राजांच्या ) ताब्यांत आहे.



५३ पन्हाळगड.



५४ नवावाडा—सातारा.

# नवावाडा—सातारा.

सातारा शहर अजिमतारा नांवाच्या डोंगरी किल्ल्याच्या पायथ्याशीं वसलें आहे. येथील हवापाणी फार उत्तम आहे. हें शहर पूर्वीं मराठेशाहीचें राजधानीचें ठिकाण असल्यामुळें येथें अनेक महत्त्वाचे ऐतिहासिक प्रसंग घडून आले. शिवाजीनें हें शहर सन १६७३ मध्यें विजापूरच्या बादशहापासून जिंकून घेतलें. पुढें राजारामानें सातारा हें आपलें राजधानीचें ठिकाण केलें. इ. सन १८१८ मध्यें पेशवाईचा अंत झाल्यावर ब्रिटिश सरकारनें सातारा संस्थान स्थापून तें प्रतापसिंह राजाच्या ताब्यांत दिलें. परंतु पुढें सन १८४८ त हें संस्थान खालसा झाल्यामुळें सातारा शहर त्या वेळेंपासून ब्रिटिश जिल्ह्याचें मुख्य ठिकाण झालें. येथें जुन्या प्रसिद्ध इमारती पुष्कळ आहेत. त्यांपैकीं शहाजी राजानें सन १८४५ त बांधलेला तीन मजली भव्य राजवाडा चित्रांत दिसत आहे. ह्या वाड्यास ‘ नवावाडा ’ असें ह्मणतात. हल्लीं ह्या वाड्यांत कांहीं सरकारी कचेऱ्या आहेत. ह्या वाडयांत लहान मोठे अनेक दिवाणखाने व चौक आहेत. त्यांपैकीं दरबार भरविण्याचा एक दिवाणखाना १६०४ फूट लांब, ४८ फूट रुंद व ३० फूट उंच असून तो भव्य व सुंदर आहे. ह्या दिवाणखान्यांत सध्यां न्यायाधीश कचेरी आहे. ह्याच्या तीन बाजूंस पाण्याचीं कारंजीं असून पूर्वीं दरबारचे वेळीं तीं उडवीत असत. वाड्याच्या भिंतींवर रामायण, महाभारत, ह्यांतील प्रसंगांचीं सुंदर चित्रें काढिलीं आहेत. वाडयाच्या उत्तरेस दोन जलमंदिरें आहेत. जलमंदिरांतील आरसेमहाल पहाण्यासारखा आहे. तेथें बऱ्याच जुन्या तसबिरी ठेविल्या आहेत. त्यांपैकीं कांहीं फार सुंदर आहेत.



# अजिमतारा किल्ला-सातारा.



सातारा शहराच्या दक्षिणेस शहराला लागूनच असलेला साताराचा प्रसिद्ध **अजिमतारा** किल्ला चित्रांत दिसत आहे. पायथ्यापासून याची उंची सुमारें ६०० फूट आहे. किल्ल्याचा आकार तिकोनी आहे. या किल्ल्याची पूर्वपश्चिम लांबी ११०० यार्ड व दक्षिणोत्तर रुंदी ६०० यार्ड आहे. या किल्ल्याला उत्तरेकडे व दक्षिणेकडे असे दोन दरवाजे आहेत. किल्ल्याच्या तटाची उंची सुमारें १५ फूट असून रुंदी १० फूट आहे. किल्ल्यावर दुसऱ्या बाजीराव पेशव्यानें बांधिलेला वाडा आहे. किल्ल्याच्या ईशान्य कोपऱ्यास मंगळाई देवीचें देवालय आहे. किल्ल्यावरून पायथ्याशीं वसलेल्या सातारा शहराचा व आसमंतांतील उंच सखल प्रदेशाचा देखावा फार उत्तम दिसतो. पूर्वेच्या बाजूस चंदनवंदन किल्ले व जरंडयाचा डोंगर, पश्चिमेस यवतेश्वर व वायव्येस सज्जनगड हे दिसतात. हा किल्ला शिलाहार राजांपैकीं दुसरा भोजराजा यानें इ. स. ११९० च्या सुमारास बांधिला. मुसलमान बादशहांनीं या किल्ल्याची मजबुती केली. शिवाजीनें हा किल्ला १६७३ त घेतला. बलाढ्य मोंगल बादशहा औरंगजेब हा दख्खन जिंकण्यासाठीं आला असतां त्यानें या किल्ल्यास इ. स. १६९९मध्यें वेढा दिला. मराठ्यांनीं मोठ्या पराक्रमानें सहा महिनेपर्यंत त्यास दाद दिली नाहीं; परंतु मोंगलांनीं मंगळाई बुरुजाच्या खालीं सुरुंग लावून किल्ला सर केला. औरंगजेबाचा मुलगा ‘ अजिमशहा ’ याच्या मदतीनें किल्ला मिळाला ह्मणून औरंगजेबानें या किल्ल्याचें नांव **अजिमतारा** असें ठेविलें. पुढें हा किल्ला शाहूमहाराजांनीं घेतला. इ. स. १८१८ त मराठ्यांबरोबरच्या तिसऱ्या लढाईच्या वेळीं हा किल्ला इंग्लिशांच्या ताब्यांत आला. अद्यापि हा किल्ला चांगल्या स्थितींत आहे.




५५ अजिमतारा—सातारा.



५६ कऱ्हाड येथील मनोरे.

# कऱ्हाड येथील मनोरे.

कृष्णा व कोयना या दोन नद्यांच्या संगमावर 'कऱ्हाड' नांवाचें अतिप्राचीन इतिहासप्रसिद्ध शहर सातारा जिल्ह्यांत आहे. या शहराचा उल्लेख इसवीसनापूर्वीच्या प्राचीन शिलालेखांत केलेला आढळतो. हें पूर्वी मुसलमानी अमदानींत प्रसिद्ध ठिकाण असून, शहाजी राजास विजापूरच्या महमद अदिलशहाकडून इ. स. १६३७ सालीं तेथील देशमुखीची सनद मिळाली. अफ़ुजुलखानाच्या वधानंतर त्याचीं बायकामुलें कांहीं काळ कऱ्हाड येथें ठेवण्यांत आलीं होतीं. शिवाजीचें पारिपत्य करण्याकरितां विजापूरचा अल्लीअदिलशहा इ. स. १६६१ सालीं मोठें सैन्य घेऊन आला, तेव्हां त्यानें कऱ्हाड येथें तळ दिला होता. कऱ्हाड शहराजवळ असलेला भुईकोट किल्ला, प्राचीन गुहा व मनोरे हे फार प्रसिद्ध आहेत. ह्यांपैकीं मनोऱ्यांचा दूरचा देखावा चित्रांत दिसत आहे. पुढच्या बाजूस मनोऱ्याकडे जाण्याचा रस्ता व त्याच्या दोहोंबाजूंस असलेलीं जुनीं पडकीं घरें चित्रांत दिसत आहेत. हे मनोरे एका बळकट कमानीवर उभे असून त्यांची उंची १०६ फूट आहे. विजापूरच्या अल्लीअदिलशहाच्या कारकीर्दींत इब्राहीमखान नांवाच्या सरदारानें हे बांधिले. चित्रांत कमान व मनोऱ्यांचा कांहीं भाग दिसत आहे. कमानींतून आंत गेल्यावर एक मोठें मैदान लागतें. त्याच्या डावेबाजूस फकीर लोकांकरितां बांधिलेली धर्मशाळा व उजव्या बाजूस एक मोठी मशीद आहे. या मशिदीच्या पश्चिम बाजूच्या भिंतींत एका काळ्या दगडावर अरबी भाषेंत कांहीं शिलालेख आहेत.

# भवानीचें देवालय-प्रतापगड.

प्रतापगड हा किल्ला सातारा जिल्ह्याच्या वायव्येस जावळी तालुक्यांतील घोरप्या डोंगरावर आहे. त्याची उंची समुद्रसपाटीपासून ३५४३ फूट असून तो महाबळेश्वरापासून सडकेनें बारा मैलांवर आहे. चंद्रराव मोरे यांचें जावळीचें राज्य शिवाजी महाराजांनीं घेतल्यावर त्या राज्यांतील घोरप्या डोंगरावर हा किल्ला मोरोपंत पिंगळे यानें इ. स. १६५६ सालीं शिवाजी महाराजांकरितां बांधिला. किल्ला बांधिल्यानंतर तीन वर्षांनीं विजापूरचा पराक्रमी सरदार अफझुलखान यानें मोठया सैन्यानिशीं या किल्ल्यास वेढा दिला. अफझुलखान हा पूर्वीं वाई प्रांताचा सुभेदार असून त्यास महाराष्ट्राची चांगली माहिती होती. अशा सरदाराशीं उघड्या मैदानांत तोंड देण्याची आपणास शक्ति नाहीं, हें जाणून शिवाजीनें त्याच्याशीं तह करण्याचें ठरविलें. तहाचें बोलणें करण्याकरितां शिवाजी व अफझुलखान ह्यांची प्रतापगडाखालीं जेव्हां भेट झाली, त्यावेळीं त्यांच्यामध्यें झटापट होऊन शिवाजीचे हातून खान मारला गेला. खानाची कबर शिवाजीनें त्यांच्या भेटीच्या जागेवरच बांधिली. ती अद्यापि किल्ल्याच्या पायथ्याशीं आहे.

अफझुलखानाच्या संकटांतून सुटल्यानंतर शिवाजी महाराजांनीं इ. स. १६६१ त प्रतापगडावर भवानीदेवीचें देवालय बांधिलें. देवालयाचा दरवाजा, किल्ल्याच्या तटासारख्या देवालयाच्या मजबूत भिंती, देवळांतील दीपमाळा, सभामंडप व देवळाचें शिखर, हीं चित्रांत दिसत आहेत. देवालयांत काळ्या पाषाणाची भवानीदेवीची फारच सुबक मूर्ति आहे. हा मौल्यवान् पाषाण शिवाजी महाराजांनीं सोनवणे नांवाच्या गृहस्थाकडून नेपाळ देशांतील गंडकी नदींतून आणविला असें ह्मणतात.



५७ भवानीचें देवालय—प्रतापगड.



५८ राजवाड्याचे भाग-रायगड.

# राजवाड्याचे भाग—रायगड.

मराठेशाहीचे संस्थापक शिवाजी महाराज ह्यांच्या राज्याभिषेकाचें स्थळ, महाराष्ट्राच्या राजधानीचें एक ठिकाण व शिवाजीचें मृत्युस्थान, ह्या दृष्टीनें महाराष्ट्राच्या इतिहासांत रायगड फार प्रसिद्ध आहे. हा किल्ला कुलाबा जिल्ह्यांतील महाड गांवापासून ईशान्येस सोळा मैलांवर सह्याद्रीच्या एका उंच शिखरावर बांधिला आहे. ह्या शिखराची उंची समुद्रसपाटीपासून २८५१ फूट आहे. हा किल्ला फार प्राचीन असून यास पूर्वी 'रायरीचा किल्ला' असें ह्मणत असत. हा पूर्वी हिंदु राजांच्या व मराठे पालेगार नांवाच्या सरदारांच्या ताब्यांत असे. पुढें बहामनी राजांच्या अंमलाखालीं जाऊन नंतर निजामशाहींतील शिरके नांवाच्या मराठे सरदारांच्या ताब्यांत होता. पुढें तहाच्या योगानें हा किल्ला अदिलशाहीकडे जाऊन जंजिऱ्याच्या शिद्दीस मिळाला व पुढें चंद्रराव मोरे नांवाच्या मराठे सरदाराच्या ताब्यांत आला. चंद्रराव मोऱ्यांचा पराभव करून त्याचें जावळीचें राज्य शिवाजी महाराजांनीं घेतल्यानंतर हा किल्ला त्यांच्या ताब्यांत आला. शिवाजीनें हा किल्ला जिंकून घेतल्यावर तो इ० स० १६६२ त विशेष मजबुतीनें बांधून काढिला. कोंकण व देश ह्यांमध्यें असा हा मजबूत व बंदोबस्ताचा किल्ला असल्यामुळें शिवाजीनें हेंच आपल्या राजधानीचें ठिकाण केलें. इ० स० १६७४ सालीं ह्याच ठिकाणीं त्यास राज्याभिषेक झाला. सातारा येथें मराठ्यांची गादी जाईपर्यंत रायगड हेंच मराठेशाहीचें राजधानीचें ठिकाण होतें. चित्रांत शिवाजीच्या वाड्याचे व राजस्त्रियांच्या महालाचे पडके भाग व गंगासागर तलाव हीं दिसत आहेत. चित्रांतील डाव्या बाजूच्या तटाच्या आंत राज्याभिषेकाची जागा, दरबारचा दिवाणखाना व सिंहासनाची जागा आहे.

# शिवाजी महाराजांची समाधि–रायगड.

शिवाजी महाराज रायगड येथें सन १६८० मध्यें मरण पावले. त्यांचें प्रेत गडावरच नगारखान्याच्या दरवाजाच्या बाहेर व जगदीश्वराच्या देवळाच्या समोर दहन केलें व त्या ठिकाणीं एक अष्टकोनी समाधि बांधिली. ही शिवाजी महाराजांची समाधि व तीवर बांधिलेली छत्री चित्रांत दिसत आहे. महाराष्ट्रांतील लोकांच्या व सरकारच्या मदतीनें ही छत्री नुकतीच बांधण्यांत आली आहे. ती बांधण्याच्या पूर्वीं शिवाजी महाराजांची समाधि ह्मणजे पांच चौरस फूट असा एक चौथरा मात्र होता व तो ऊन, वारा, पाऊस खात उघडाच पडला होता ! उत्तर हिंदुस्तानांतील मुसलमानी बादशाहांच्या कबरीवर बांधलेल्या भव्य व सुंदर इमारती कोणीकडे आणि महाराष्ट्रास स्वातंत्र्य मिळवून देणाऱ्या वीर–विभूति शिवाजीची ही समाधि कोणीकडे !!

शिवाजीची ही समाधि कितीही साधी असो, परंतु महाराष्ट्रांतील ऐतिहासिक स्थळांमध्यें हिचें महत्त्व विशेषच आहे. शिवाजीच्या ह्या समाधीच्या पूर्वेस त्याच्या विश्वासू व आवडत्या कुत्र्याची एक लहानशी समाधि आहे. शिवाजीचें प्रेत जळत असतां त्या स्वामिभक्त कुत्र्यानें त्याच्या चितेंत एकदम उडी घालून आपणास जाळून घेतलें अशी आख्यायिका आहे. शिवाजीच्या समाधीच्या दर्शनाकरितां येणाऱ्या लोकांस राहण्याकरितां तेथें एक नवीन धर्मशाळा बांधण्यांत आली असून गडावर जाण्याचा रस्ताही दुरुस्त करण्यांत आला आहे.



५९ शिवाजी महाराजांची समाधि–रायगड.



६० शनिवारवाडा-पुणें.

# शनिवारवाडा–पुणें.

पुणें येथील पेशव्यांचा इतिहासप्रसिद्ध शनिवार वाडा चित्रांत दाखविला आहे. वाडा बांधण्यास पेशव्यांनीं हीच जागा कां पसंत केली ह्याबद्दल एक मनोरंजक आख्यायिका आहे. एकदां थोरले बाजीराव पेशवे या रस्त्यानें चालले असतां, एका कुत्र्याच्या पाठीस एक ससा लागल्यामुळें कुत्रा अगदीं घाबरून गेला आहे, असें त्यांच्या नजरेस पडलें. वास्तविक कुत्र्यास पाहातांच ससा भिऊन पळून जावा, परंतु वरीलप्रमाणें उलट गोष्ट घडलेली पाहातांच बाजीरावांस आश्चर्य वाटलें, व ह्या जागेचाच हा प्रभाव आहे अशी त्यांची खात्री होऊन, लागलीच त्यांनीं त्या ठिकाणीं वाडा बांधण्यास इ० स० १७३० सालीं सुरवात केली. पुढें तो नानासाहेब पेशव्यांच्या कारकीर्दींत पूर्ण झाला. वाडयाचा भव्य कोट नानासाहेब पेशवे ह्यांनीं इ० स० १७५५ मध्यें बांधिला. हा कोट चौकोनी आहे व त्यास सात बुरूज व पांच दरवाजे आहेत. त्यांपैकीं मुख्य पुराणा दरवाजा ( दिल्ली दरवाजा ) हा उत्तरेच्या बाजूस आहे. त्याचा देखावा चित्रांत दिसत आहे. दोन्ही बाजूंस दोन भव्य व उंच बुरूज आहेत व त्यांस तोफा व बंदुका डागण्याकरितां ठिकठिकाणीं भोंकें ठेविलीं आहेत. मध्यभागीं दरवाजांत उंच कमान असून तिच्यावर नगारखान्याची जुनी इमारत आहे. मुख्य राजवाडा सहा मजली असून त्यांत अनेक चौक होते. ता. ८ फेब्रुआरी सन १८२२ रोजीं मुख्य वाडा व इतर इमारती जळून गेल्या. भोंवतालचा प्रचंड तट व त्यांतील भव्य दरवाजे ह्यांशिवाय विशेष जुनें असें कांहीं आतां शिल्लक राहिलेलें नाहीं. अलीकडे मुंबईसरकारनें तटाच्या आंतील सर्व जागा उकरून पूर्वीच्या अनेक इमारतींचे अवशेष भाग उजेडांत आणिले आहेत.

# नानावाडा—पुणें.

पेशवाईच्या उतरत्या काळांतील प्रसिद्ध मुत्सद्दी व कर्ते पुरुष नाना फडणवीस यांचा वाडा चित्रांत दाखविला आहे. पुण्यांतील त्यांचा हा जुना वाडा आज पूर्वींसारखा राहिलेला नाहीं. तो वाडा पाडून त्याठिकाणीं चित्रांत दिसत असलेली सुंदर इमारत बांधिलेली आहे. ही इमारत पुण्यांतील डेक्कन एज्युकेशन सोसायटीच्या न्यू इंग्लिश स्कूल-करितां इ० स० १९०७ सालीं बांधिली. तथापि नानांचें स्मरण राहावें म्हणून जुन्या वाडयाचा कांहीं भाग तसाच ठेवून त्याला जोडून नवीन इमारत बांधिली व तिला "नानावाडा बिल्डिंग्स" असें नांव दिलें. चित्रांत डाव्या बाजूस रस्त्याला लागून वाडयाचा दुमजली जुना भाग दिसत आहे. ह्या जुन्या इमारतीला पुढील भिंतींत जुन्या तऱ्हेच्या खिडक्या व कमानी आहेत. जुन्या भागांत तळमजल्यावर देवडी असून दुसऱ्या मजल्यावर दिवाण-खाना आहे.तेथें नाना बसत असत. तेथील छतावरील कोरीव नक्षीकाम फारच सुंदर आहे. डे. ए० सोसायटीनें नाना फडणविसांचें स्मरण रहावें ह्मणून त्यांची एक सुंदर तसबीर तेथें मुद्दाम ठेविली आहे. ह्या दिवाणखान्यांत नानांची खासगी बैठक असून तेथें राजप्रकरणीं गुप्त खलबतें चालत ह्मणून त्या जागेस 'खलबतखाना' असें ह्मणत असत. सवाई माधवराव पेशवे गादीवर बसले त्यावेळीं ते वयानें लहान असल्यामुळें त्यांच्यावर नजर राहावी ह्मणून नानांनीं हा आपला राहण्याचा वाडा मुद्दाम शनिवारवाडयानजीक बांधिला असें ह्मणतात.



६१ नानावाडा—पुणें.

# पर्वती–पुणें.

पर्वती नांवाची टेकडी पुण्याच्या नैर्ऋत्येस अर्ध्या मैलावर आहे. पुणें शहरांतील अनेक प्रसिद्ध व प्रेक्षणीय स्थळांमध्यें पर्वतीची गणना होते. पूर्वीं ह्या टेकडीची विशेष प्रसिद्धि नव्हती. नानासाहेब पेशव्यांनीं ह्या टेकडीवर शिवपंचायतनाचें देऊळ व टेकडीवर चढण्यास पायऱ्या बांधिल्यापासून ह्या टेकडीचें वैभव वाढूं लागलें. चित्रांत पर्वतीचा देखावा दिसत आहे. दगडी पायऱ्या चढून वर गेल्यावर उजवे हातास नानासाहेब पेशव्यांनीं बांधिलेलें देऊळ आहे. देवळाच्या गाभाऱ्यांत शिवाची पिंडी असून तिच्यामागें कमानींत पार्वती व बाल-गणपति यांच्या सुवर्णमूर्ती अंकावर धारण करणारी अशी शंकराची रौप्यमूर्ति आहे. ह्या मुख्य देवळाच्या चार कोपऱ्यांत विष्णु, सूर्य, गणपति व देवी ह्या देवतांचीं चार लहान देवळें आहेत. चित्रांत उजव्या बाजूस उंच तट व त्यावरील इमारती दिसत असून पलीकडे शिवाच्या देवळाचा कळस वर आलेला नजरेस पडतो. टेकडीच्या दक्षिण भागीं श्री विष्णूचें देऊळ असून पलीकडे दुसऱ्या बाजीरावानें बांधिलेल्या तिमजली वाड्याच्या उंच व पडक्या भिंती आहेत.

पर्वतीची टेकडी ही नानासाहेब पेशव्यांची फार आवडती जागा असून ते तेथें वारंवार रहात असत. पानिपतच्या अपयशानंतर नानासाहेब पेशव्यांनीं पर्वतीवरच ‘ भाऊ भाऊ ’ ह्मणत प्राण सोडिला. शिवालयाच्या उत्तरेकडील तटाच्या एका भिंतीवर उभा राहून दुसरा बाजीराव खडकी येथें ता० ५ नोव्हेंबर सन १८१७ रोजीं स्वतःचें सैन्य व इंग्रज ह्यांमध्यें होत असलेली लढाई दुर्बिणींतून पाहात होता असें ह्मणतात. श्रावणांतील प्रत्येक सोमवारीं व महाशिवरात्रीस येथें मोठी यात्रा भरते.

# महादजी शिंद्याची छत्री–पुणें.

पुणें शहराच्या आग्नेयेस तीन मैलांवर वानवडी नांवाच्या खेड्यानजीक एका ओढ्याच्या कांठीं महादजी शिंद्याची छत्री आहे. चित्रांत ह्या छत्रीचा देखावा दिसत आहे. मराठेशाहीच्या उतरत्या काळांत महादजी हा मोठा शूर, वीर व मुत्सद्दी पुरुष होऊन गेला. उत्तर हिंदुस्तानांत मराठ्यांचें वर्चस्व स्थापून तो पुण्यास परत आला असतां वानवडीनजीक त्याच्या सैन्याचा तळ होता तेथें तो ता. १२ फेब्रुवारी सन १७९४ मध्यें मृत्यु पावला. त्याचें प्रेत गांवानजीक एका ओढ्याच्या कांठीं दहन करण्यांत आलें. त्या ठिकाणीं जी जुनी छत्री होती, तिचा जीर्णोद्धार ग्वाल्हेरचे माजी महाराज माधवराव शिंदे ह्यांनीं करून त्या ठिकाणीं मृतपूर्वजांच्या लौकिकास शोभेल अशा तऱ्हेची सुंदर छत्री त्यांनीं बांधिली. चित्रांत गांवाजवळचा नाला व त्यावरील पुलाचा रस्ता हीं दिसत आहेत. त्याच्या पलीकडे छत्रीच्या चौकोनी आवाराची पश्चिमेकडील दगडी भिंत आहे. मुख्य प्रवेशद्वार पूर्वेस असून त्यावर नगारखान्याची दुमजली इमारत आहे. ह्या इमारतीच्या मागें मध्यभागीं चौकोनी सभामंडप आहे. त्याच्या आंत व बाहेर केलेलें कोरीव व रंगीत काम प्रेक्षणीय आहे. ह्या इमारतींत महादजीची पालखी आणि लांब दांडे असलेले पंखे ह्या ऐतिहासिक वस्तु ठेविल्या आहेत. सभामंडपाच्या पश्चिमेस उंच शिखर असलेली व देवळासारखी चित्रांत दिसणारी जी इमारत आहे तीच मुख्य छत्री होय. हिच्या गाभाऱ्यांत मध्यभागीं जमिनीवर शिवाची पिंडी आहे व पलीकडे भिंतीजवळ महादजीचा पुतळा बसविला आहे. ह्या छत्रीच्या खर्चाकरितां शिंदे सरकारकडून वर्षासन चालू असून त्यांतून रोजची पूजा व पुण्यतिथीच्या उत्सवाचा खर्च होतो.



६२ महादजी शिंद्यांची छत्री—पुणें.



६४. माधवराव पेशव्यांचें मृत्युस्थान—थेऊर.

# माधवराव पेशव्यांचें मृत्युस्थान–थेऊर.

पुण्याच्या पूर्वेस सुमारें तेरा मैलांवर मुळामुठा नदीचे कांठीं थेऊर या नांवाचें एक लहानसें खेडेंगांव आहे. तेथील गणपति हा अष्टविनायकांपैकीं असल्यामुळें तें स्थान पवित्र गणलें जातें. थोरले माधवराव पेशवे ह्यांनीं गणपतीच्या देवळापुढें चाळीस हजार रुपये खर्च करून एक सभामंडप व ओवऱ्या बांधिल्या. चित्रांत देऊळ व सभामंडप दिसत आहे. थोरले माधवराव पेशवे हे गणपतिभक्त असल्यामुळें ते तेथें वारंवार दर्शनास व विश्रांतीकरितां कांहीं दिवस रहाण्यास जात असत. त्यांनीं स्वतःस राहाण्याकरितां थेऊर येथें एक स्वतंत्र वाडा बांधिला होता.

सन १७७२ मध्यें जेव्हां माधवराव क्षयरोगानें अतिशय आजारी झाले, तेव्हां ते मुद्दाम थेऊर येथें जाऊन राहिले. तेथें त्यांनीं पुष्कळ औषधोपचार व दैवी उपायही केले; परंतु त्यांस गुण आला नाहीं. आपला अंतकाळ जवळ आला आहे असें पाहून त्यांनीं राज्यासंबंधीं सर्व व्यवस्था नाना फडणवीस व सखारामबापू ह्या दोन विश्वासाच्या माणसांस सांगितली व स्वतःला गणपतीच्या देवळांत नेण्यास सांगितलें. ह्या देवळांतच त्यांनीं तारीख १८ नोव्हेंबर सन १७७२ रोजीं आपला प्राण सोडिला. ह्मणून चित्रांत दिसणाऱ्या देवळाला एका प्रकारें ऐतिहासिक महत्त्व प्राप्त झालें आहे. माधवरावांची पत्नी रमाबाई हिनें त्यांच्याबरोबर सहगमन केलें. तें सहगमनाचें स्थान नदीकांठीं असून तेथें "सतीचें वृंदावन" बांधिलें आहे. तें पाहून "धन्य माधवराव पेशवे व धन्य सती रमाबाई" असे उद्गार प्रेक्षकांच्या मुखांतून निघाल्यावांचून राहात नाहींत.

# शिवाजीचें जन्मस्थान-शिवनेरी

पुणें जिल्ह्यांत जुन्नरच्या पश्चिमेस सुमारें अर्ध्या मैलावर शिवनेरचा किल्ला आहे. हा. इ० स० १४३६ त मलिकउल्तुजार नांवाच्या मुसलमान बादशहानें बांधिला. इ. सनाचीं पहिलीं तीन शतकें हें बुद्ध-धर्मीयांचें मुख्य स्थान होतें. पुढें येथें हिंदु राजे राज्य करीत असत. देवगिरीच्या हिंदुराजांचा या किल्ल्यावर अंमल होता. पुढें बहामनी व निजामशाहीच्या ताब्यांत हा किल्ला गेला. किल्ल्याची बहुतेक तटबंदी मुसलमानांच्या वेळची असून त्यावेळच्या इमारती, मशिदी व थडगीं तेथें आहेत.

शिवनेर हें शिवाजीची जन्मभूमि व बालपणचें राहाण्याचें ठिकाण ह्मणून महाराष्ट्राच्या इतिहासांत प्रसिद्ध असून पवित्र मानलें जातें. किल्ला चढून वर गेल्यावर प्रथम शिवाई देवीचें देवालय दिसतें. शिवाजीची आई जिजाबाई या किल्ल्यावर गरोदरपणीं असतांना या देवीची फार भक्ति करीत असे व तिच्याच प्रसादानें आपणाला मुलगा झाला असें मानून तिनें त्याचें नांव शिवाजी ठेविलें असें ह्मणतात. शिवाजी महाराज बालपणीं या किल्ल्यावर असतांना तेथें त्यांनीं ज्या अनेक गोष्टी ऐकिल्या व पाहिल्या, त्यांचे त्यांच्या कोमल मनावर झालेले परिणाम पुढें थोरपणीं दिसून आले, या दृष्टीनें शिवनेरच्या किल्ल्याला महाराष्ट्राच्या इतिहासांत फार महत्त्व आहे. या किल्ल्यावर ज्या इमारतींत शिवाजीचा जन्म झाला, ती इमारत चित्रांत दिसत आहे. इमारतीचें काम दगडी असून ती तीनशें वर्षें ऊन, वारा, पाऊस खात उघडी पडल्यामुळें हल्लीं बहुतेक पडून गेलेली आहे. शिवाजी महाराजांची महाराष्ट्रांतील अद्वितीय कामगिरी लक्षांत घेतां ह्या इमारतीचा जीर्णोद्धार करणें महाराष्ट्रीयांचें कर्तव्य आहे.



६५ शिवाजीचें जन्मस्थान--शिवनेर.



६६. तोरणा किल्ला.

# तोरणा किल्ला.

पुण्याच्या नैर्ऋत्येस सुमारें वीस मैलांवर तोरणा या नांवाचा डोंगरी किल्ला आहे. हा भोर संस्थानच्या हद्दींत आहे. हा नीरा नदीच्या उगमाजवळ असून चढण्यास बराच कठीण आहे. तुटलेल्या कड्याप्रमाणें त्याच्या उंच उतरल्या बाजू व त्यांवर असलेले तट चित्रांत दिसत आहेत. किल्ल्याचा दुरून दिसणारा देखावा चित्रांत दाखविला आहे. हा किल्ला पूर्वी विजापूरच्या बादशाहाच्या ताब्यांत असून त्यावर मुसलमान किल्लेदार होता. शिवाजीनें हा किल्ला वयाचे सोळावे वर्षी इ. स. १६४६ त जिंकून घेतला. मराठेशाही स्थापन करण्याच्या शिवाजीच्या पराक्रमास येथूनच प्रारंभ झाला. हा किल्ला घेतल्यानंतर किल्ल्याची दुरुस्ती करीत असतांना शिवाजीस सोन्याच्या नाण्यांनीं भरलेला हांडा जमिनींत सांपडला. नवीन किल्ले बांधण्याच्या व दुरुस्त करण्याच्या कामीं व सैन्याची वाढ करण्यास या संपत्तीचा त्याला फार उपयोग झाला व या दैवी लाभामुळें शिवाजीस ईश्वरी साहाय्य आहे असा त्याच्या भाविक मावळे लोकांचा पूर्ण समज झाला. यामुळें शिवाजीस अनेक लोक येऊन मिळूं लागले व त्याच्या कार्याला बरेंच सामर्थ्य आलें.

# पुरंदरचा किल्ला.

पुरंदरचा किल्ला पुणें जिल्ह्यांत सासवडचे वायव्येस सहा मैलांवर एका उंच डोंगरावर बांधिलेला आहे. त्याची समुद्रसपाटीपासून उंची सुमारें ४५६४ फूट आहे. किल्ल्याच्या पश्चिमेस पायथ्याशीं उभें राहून किल्ल्याकडे पाहिलें असतां त्याचा दिसणारा देखावा चित्रांत दिसत आहे. किल्ल्याचे पायथ्यापासून अदमासें १००० फूट उंचीवर थोडासा सपाट प्रदेश आहे. तेथें इंग्लिश सरकारची फौजेची छावणी आहे. चित्राच्या मध्यभागीं छावणींतील बंगले व बराकी दिसत आहेत. छावणीच्या उजव्या बाजूस किल्ल्याच्या उंच टोंकावर जाणारा एक लहान रस्ता चित्रांत दिसत आहे. या रस्त्याच्या दोहों बाजूंस किल्ल्यावरील पूर्वींचे वाडे, देवालयें, धान्यांचीं व दारुगोळ्यांचीं कोठारें वगैरे इमारतीचे अवशेष भाग पडलेले दिसतात.

शिवाजीचा आजा मालोजी भोसले ह्याला ज्यावेळीं पुणें व सुपें प्रांतांची जहागिरी मिळाली, त्यावेळीं त्याला हा किल्ला मिळाला. शिवाजीची दक्षिणेंतील बंडाळी मोडण्याकरितां विजापूरच्या महमद अदिलशहानें शहाजीस पुरंदर किल्ल्यांत कोंडून ठेविलें होतें असें ह्मणतात. हा किल्ला शिवाजीनें १६४६ च्या सुमारास घेतला. जयसिंग व दिलीरखान यांनीं ह्या किल्ल्यास १६६५ त वेढा दिला. त्यावेळीं किल्लेदार मुरारबाजी यानें मोठा पराक्रम केला. शाहू दिल्लीहून परत आल्यानंतर त्यानें हा किल्ला आपल्या ताब्यांत घेतला. छत्रपति संभाजी महाराज व सवाई माधवराव पेशवे यांचा जन्म याच किल्ल्यावर झाला. राघोबादादा इंग्लिशांचे आश्रयास गेल्यावर इंग्लिश व पेशवे यांच्यामध्यें झालेला प्रसिद्ध पुरंदरचा तह येथेंच झाला.



६७ पुरंदरचा किल्ला.



६८ सिंहगड.

# सिंहगड.

कोंडाणा अथवा सिंहगड नांवाचा इतिहासप्रसिद्ध किल्ला पुणें शहराच्या नैर्ऋत्येस बारा मैलांवर सह्याद्रीच्या एका उंच शिखरावर असून त्याची समुद्रसपाटीपासून उंची ४३०० फूट आहे. गडाचा आकार साधारणपणें त्रिकोनी आहे. गडाची दक्षिणोत्तर लांबी २५०० फूट आणि पूर्वपश्चिम रुंदी १००० फूट आहे. किल्ल्यावरून भोंवतालीं नजर फेकिली असतां सह्याद्रीचीं उंच शिखरें व त्यांवरील पुरंदर, तोरणा व राजगड हे इतिहासप्रसिद्ध किल्ले, खोल दऱ्या, मुठा नदीचा प्रवाह व खडकवासल्याचा तलाव, असा रमणीय देखावा दृष्टीस पडतो. चित्रांत सिंहगडचा कल्याणदरवाजा व त्याखालीं बांधिलेली तटबंदी हीं दिसत असून डावे बाजूस तुटलेला उंच प्रख्यात कडाही दिसत आहे.

शिवाजीच्या काळीं हा अजिंक्य समजला जाणारा किल्ला मोंगलांच्या ताब्यांत होता. तानाजी मालुसऱ्यानें विलक्षण धाडस व पराक्रम करून घोरपडीच्या साहाय्यानें चित्रांत दिसणारा उंच कडा चढून हा किल्ला सर केला. किल्ला सर करितांना शिवाजीचा सेनापति तानाजी व मोंगलांचा किल्लेदार उदयभानु हे पडले. किल्ला सर करून तानाजी पडला ही बातमी शिवाजीस समजतांच त्याच्या तोंडून 'गड आला पण सिंह गेला' असे उद्गार बाहेर पडले. तेव्हांपासून ह्या किल्ल्याचें पूर्वींचें नांव कोंडाणें हें बदलून त्यास 'सिंहगड' हें नांव प्राप्त झालें. हल्लीं किल्ल्यावर तानाजीची समाधि, उदयभानूचें थडगें व राजाराम महाराजांची समाधि हीं दिसतात. पुढें औरंगजेबानें हा किल्ला इ. स. १७०२ सालीं जिंकून घेतला.

# भुइकोट किल्ला--सोलापूर.

सोलापूर शहराच्या नैर्ऋत्येस जो जुना भुइकोट किल्ला आहे त्याचा देखावा चित्रांत दाखविला आहे. ह्या किल्ल्याचा आकार साधारण चौकोनी असून त्याची लांबी ९६० फूट व रुंदी ५२८ फूट आहे. किल्ल्याला दुहेरी तट असल्यामुळें तो फार मजबूत आहे. बाहेरचा कोट मुसलमानी अमदानींत हसन गंगूनें इ० स० १३१३ त बांधिला. ह्यास २७ बुरूज असून त्याची उंची सुमारें ३० फूट आहे. आंतील कोट इ. सनाच्या बाराव्या शतकांत हिंदुराजांनीं बांधिलेला असून त्याची उंची बाहेरील कोटापेक्षां सुमारें दहा फूट अधिक आहे. किल्ल्यास उत्तरेच्या बाजूस एकच दरवाजा आहे व किल्ल्यांत जाण्यास खंदकावर एक पूल बांधिला आहे. चित्रांत खंदक व त्यावरील पूल दिसत आहे. त्याच्या पुढें आंतील दरवाज्यांत जाण्यास बुरुजामध्यें एक कमान आहे. ह्या कमानींतून पुढें गेलें असतां किल्ल्याच्या अगदीं आंतल्याभागीं जाईपर्यंत एकापुढें एक असे तीन मजबूत दरवाजे लागतात. हल्लीं किल्ल्यांत कांहीं पडक्या इमारतींचे अवशेष भाग आहेत व तेथें वस्ती नाहीं.

हा किल्ला पूर्वीं बहामनी राज्याच्या ताब्यांत होता. पुढें तो निजामशाहीकडे आला. इ० स० १५६२ त हा किल्ला चांदबिबीच्या लग्नांत अदिलशाहीस आंदण मिळाला. १६२६ त शहाजीनें हा जिंकून घेतला. पुढें मलिकंबरनें हा किल्ला वेढा देऊन मिळविला. औरंगजेबानें या किल्ल्यास इ० स० १६८६ त वेढा दिला. पुढें हा किल्ला हैद्राबादचा निजाम व मराठे यांजकडे अनुक्रमें जाऊन शेवटीं जनरल मनरोनें इ० स० १८१८ त मराठ्यांपासून जिंकून घेतला.



६९ भुइकोटकिल्ला—सोलापूर.



७० खर्डे येथील किल्ला.

# खर्डें येथील किल्ला.

खर्डें हा गांव नगर जिल्ह्यांतील जामखेड पेठ्यांत आहे. हा पूर्वीं निजामशाहींतील सरदार निंबाळकर यांचा जहागिरीचा गांव होता. त्यांनीं इ० स० १७४५ मध्यें खर्डें गांवाच्या आग्नेयेस एक मजबूत भुइकोट किल्ला बांधिला. चित्रांत किल्ल्याचा देखावा दिसत आहे. त्याचा आकार चौकोनी आहे. भोंवतालचा कोट दगडांनीं भक्कम बांधिलेला असून त्याची उंची ४० फूट आहे. चित्रांत तट व बुरूज दिसत असून किल्ल्याचा मुख्य दरवाजाही दिसत आहे. कोट व बुरूज ह्यांचे वरचे बाजूस शत्रूवर बंदूकींचा व तोफांचा मारा करण्याकरितां भोकें ठेविलीं आहेत. किल्ल्याच्या आंतील जागा ३०० चौरस फूट आहे. हल्लीं आंत एक लहानशी मशीद व पडकी विहीर आहे.

खर्डें येथें फक्त एकच ऐतिहासिक प्रसंग घडून आला. परंतु तो अत्यंत महत्त्वाचा असल्यामुळें मराठ्यांच्या इतिहासांत खर्डें हा गांव प्रसिद्ध आहे. खर्डें गांवाच्या जवळच रणटेकडीवर निजामअली व मराठे ह्यांमध्यें सन १७९५ मध्यें मोठी लढाई होऊन निजामचा पराभव झाला. तेव्हां तो खर्डें किल्ल्यांत गेला. मराठ्यांनीं किल्ल्यास वेढा दिला, तेव्हां दोन दिवसांनीं निजामानें मराठ्यांशीं तह केला. ह्या लढाईत पेशवे व त्यांचे सर्व सरदार लढण्याकरितां एकत्र जमा झाले होते. मराठ्यांच्या संयुक्त सैन्यानें जिंकलेली हीच शेवटची मोठी लढाई होय. खर्डें येथील जय ह्मणजे मराठेशाहीच्या वैभवाचा कळस होय. ह्यानंतर केवळ तेवीस वर्षांनीं मराठेशाही नष्ट झाली.

# अह्मदनगरचा किल्ला.

दौलताबादच्या निजामशाहींतील पहिला सुलतान मलिक अहमद बहिरी ह्यानें हा किल्ला इ. स. १४९४ च्या सुमारास बांधिला. ह्या किल्ल्याचें मूळचें नांव "बागनिजाम" असें होतें. किल्ल्याचा घेर १ मैल ८० यार्ड असून तो दीर्घवर्तुलाकृति आहे. ह्यास २४ बुरूज आहेत व त्यांस निजामशाहींतील प्रसिद्ध मुत्सद्दी, प्रधान व सेनापति ह्यांचीं नांवें दिलेलीं आहेत. चित्रांत समोर एक दुमजली प्रचंड बुरुज दिसत आहे. ह्या बुरजास वळसा घातल्यावर किल्ल्यांत जाण्याचा उत्तराभिमुख मुख्य दरवाजा लागतो. मागील बाजूस पूर्वेकडे जो दुसरा दरवाजा व झुलता पूल हल्लीं दिसतो, तो इंग्रजी अमदानींत झाला.

ह्या किल्ल्यांत ऐतिहासिक महत्त्वाचे अनेक प्रसंग घडून आले आहेत. अकबराचा मुलगा मुराद ह्यानें सन १५९६ मध्यें या किल्ल्यास वेढा दिला असतां चांदबिबी ह्या शूर स्त्रीनें त्याच्याशीं लढून किल्ल्याचा बचाव केला. मुरादच्या मृत्यूनंतर १५९९ त दानियलनें हा किल्ला जिंकून घेतला. चांदबिबीचें अद्भुत शौर्य व तिचा खून हे प्रसंग याच वेळीं घडून आले. औरंगजेबानें १६४० च्या सुमारास या किल्ल्याची दुरुस्ती केली. सदाशिवराव-भाऊ पेशव्यांनीं हा किल्ला १७५९ त घेतला. पुढें हा किल्ला मराठ्यांचे ताब्यांत होता. त्या वेळीं तुळाजी आंग्रे, मोरोबादादा व नाना फडणवीस ह्यांसारखे प्रसिद्ध पुरुष ह्या किल्ल्यांत कांहीं काळ कैदी होते. १७९७ त हा किल्ला शिंद्यांच्या ताब्यांत गेला. सन १८०३ मध्यें जनरल वेल्स्ली ह्यानें हा किल्ला भिंगारचे रघुरावबाबा देशमुख यांच्या मदतीनें सर केला.



७१ अहमदनगरचा किल्ला.



७२ औरंगजेबाचें मृत्युस्थान—अहमदनगर.

# औरंगजेबाचें मृत्युस्थान—अहमदनगर.

मोंगलसाम्राज्याचा माध्यान्ह व सायंकाळ पाहाणारा हिंदुस्तानच्या इतिहासांतील अति प्रसिद्ध मोंगल बादशहा औरंगजेब हा सन १६८३ सालीं दक्षिण हिंदुस्तान जिंकण्याकरितां दिल्ली सोडून निघाला. प्रथम त्यास कांहींसें यश आल्यासारखें दिसलें. परंतु पुढें त्याचें मराठ्यांपुढें कांहीं चालेना. शेवटीं हा बादशहा अहमदनगर येथें आजारी पडून सन १७०७ सालीं मरण पावला, त्यावेळीं त्याचें वय ९१ वर्षांचें होतें. तो जेथें मरण पावला, तें स्थान अहमदनगर शहरापासून पूर्वेस तीन मैलांवर आहे. त्या ठिकाणीं बांधिलेला दर्गा चित्रांत दिसत आहे. औरंगजेब जरी ह्या ठिकाणीं मरण पावला, तरी त्याचें प्रेत मोंगलाईंत वेरूळजवळ रोझें येथें नेऊन पुरण्यांत आलें व तेथेंच त्याची मुख्य कबर आहे. अहमदनगर येथें फक्त त्याच्या शवास स्नान घातलें व त्या जागेवर एक कबर बांधण्यांत आली. ह्या कबरस्तानाभोंवतीं एक मोठा तट बांधिलेला आहे. तटांतील दरवाजा व त्यावरील पहारेकरी शिपाई चित्रांत दिसत आहे. दरवाज्याच्या आंत आवाराच्या मध्यभागीं ही कबर एका मोठ्या चबुतऱ्यावर असून तिच्यावर इमारत वगैरे कांहीं नाहीं. चित्रांत दरवाज्याच्या आंत दोन मनोरे व मध्यें असलेला कबरीचा कांहीं भाग दिसत आहे. कबरीच्या पश्चिम बाजूस एक मशीद आहे व तिच्या दोन्ही बाजूंस मौलवी, फकीर, वगैरे लोकांस राहाण्याकरितां जागा बांधिलेली आहे. तीस ‘ हुजरा ’ असें ह्मणतात. कबरीच्या पूर्वेस बारदरी नांवाची इमारत आहे. तिचें काम साधेंच पण प्रेक्षणीय आहे. ह्या दर्ग्याची व्यवस्था फार उत्तम ठेविली आहे. येथें प्रतिवर्षीं औरंजेबाच्या मृत्युदिवशीं मोठा उरूस भरतो.

# हजरत शाहशरीफ ह्यांचा दर्गा—अहमदनगर.

अहमदनगरच्या किल्ल्याच्या उत्तरेस सुमारें अर्ध्या मैलावर हजरत शाहशरीफ नांवाच्या मुसलमान साधूंचा दर्गा आहे. तो चित्रांत दिसत आहे. शाहशरीफ यांचा जन्म सन १५२६ च्या सुमारास गुजराथेंत झाला. निजामशाहीचा दुसरा बादशहा बुऱ्हान निजामशहा गादीवर असतां ते आपली बहीण बीबी अच्छीमां हिला घेऊन अहमदनगर येथें आले व किल्ल्याच्या उत्तरेस सुमारें अर्ध्या मैलावर एका ओढ्याच्या कांठीं लहानशा घरांत राहूं लागले. हें घर अद्यापि राखून ठेवलेलें असून त्यास हल्लीं ‘ हुजरा ’ असें ह्मणतात. शाहशरीफ ह्यांची लहानपणापासून साधुवृत्ति असे व ते आमरण अविवाहित राहिले. अहमदनगर येथें आल्यावर त्यांनीं आपल्या बहिणीचें लग्न फीरोज महंमद नांवाच्या एका कुलीन गृहस्थाशीं लावून दिलें. तिला लाड महंमद नांवाचा एक मुलगा व बीबी मानकजी नांवाची एक मुलगी अशी दोन अपत्यें झालीं व त्या दोन्ही मुलांस शाहशरीफ ह्यानीं दत्तक घेतलें. त्यांचा वंश अद्यापि चालू आहे.

शाहशरीफ ह्यांच्या साधुत्वाची कीर्ति चोंहोंकडे पसरली होती. त्यांनीं दाखविलेल्या चमत्कारांविषयीं पुष्कळ दंतकथा प्रसिद्ध आहेत. राजे मालोजी भोंसले ह्यांस पुत्रसंतति होत नव्हती. ह्मणून त्यांनीं शाहशरीफ ह्यांची प्रार्थना केली. त्यांच्या कृपाप्रसादानें मालोजीस दोन पुत्र झाले; ह्मणून त्यांनीं त्यांचीं नांवें शहाजी व शरीफजी अशीं ठेविलीं. ह्याच शहाजीच्या पोटीं महाराष्ट्रराज्यसंस्थापक शिवाजी जन्मास आला. शाहशरीफ हे साधु सन १६१७ च्या सुमारास मरण पावले. त्यांची कबर त्यांच्या राहाण्याच्या ठिकाणानजीक बांधण्यांत आली. या स्थानास दर्गादायरा असें ह्मणतात. तो चित्रांत दिसत आहे.



७२ शहाशरीफ ह्याची कबर—अहमदनगर.



७४ चांदविबीचा महाल—अहमदनगर.

# चांदबिबीचा महाल—अहमदनगर.

अहमदनगरच्या पूर्वेस सुमारें सहा मैलांवर शहापूर नांवाच्या गांवानजीक एक उंच टेकडी आहे, तिच्यावर चित्रांत दिसणारी इमारत बांधिलेली आहे. तीस 'चांदबिबीचा महाल' असें ह्मणतात. ह्या नांवावरून निजामशाहींतील शूर स्त्री चांदबिबी हिचा ह्या इमारतीशीं निकट संबंध असावा असें वाटेल; परंतु तिचा कोणत्याही प्रकारें ह्या महालाशीं संबंध नसतां ह्या इमारतीस 'चांदबिबीचा महाल' असें नांव कां पडावें हें समजत नाहीं. अहमदनगरचा बादशहा मूर्तिजा निजामशहा ह्याचा प्रसिद्ध वजीर सलाबतखान ह्यानें ही इमारत सन १५८० च्या सुमारास बांधिली असें दिसून येतें. यावरून या इमारतीचें नांव सलाबतखान महाल असें असावें.

ह्या इमारतीच्या तळघरांत सलाबतखान व त्याची पत्नी ह्यांच्या कबरी आहेत. ही प्रचंड इमारत अष्टकोनी असून तिच्या पायाचा घेर ३०० फूट आहे. इमारतीस तीन मजले आहेत. परंतु वरच्या मजल्याचें काम अपुरें राहिलेलें दिसतें. ह्यावरून त्याच्यावरही आणखी कांहीं मजले अगर घुमट बांधण्याचा विचार असावा असें वाटतें. वर जाण्यास भिंतींतून जिने काढिले आहे. इमारतीच्या तिन्ही मजल्यांस प्रत्येक बाजूस एक एक कमान आहे. त्यांपैकीं कांहीं कमानी अलीकडे बंद केल्या आहेत. चित्रांत इमारतीच्या मध्यभागीं असलेली लहानशी पांढरी कमान दिसत आहे. तींतून आंत थडगीं असणाऱ्या तळघरांत जाण्यास रस्ता आहे. ह्या इमारतीची उंची सुमारें ९० फूट आहे. ज्या टेकडीवर ही इमारत बांधली आहे तिची उंची समुद्रसपाटीपासून ३०८० फूट व अहमदनगर शहरापासून ९०० फूट आहे. इमारतीच्या अगदीं वरच्या भागावरून फार दूरवरच्या प्रदेशाची शोभा सुंदर दिसते.

# राघोबादादाचा वाडा–कोपरगांव.

कोपरगांव हें तालुक्याचें ठिकाण नगर जिल्ह्यांत दौंड मनमाड या आगगाडीच्या रस्त्यावर एक स्टेशन असून गोदावरी नदीच्या उत्तरतीरावर आहे. प्रसिद्ध राघोबादादा पेशव्याचें कोपरगांव हें फार आवडतें ठिकाण होतें व त्यानें तेथें राहण्याकरितां कांहीं वाडे बांधिले होते. नारायणराव पेशव्यांच्या वधानंतर पेशव्यांची गादी बारभाईच्या कारस्थानामुळें राघोबास सोडावी लागली. तेव्हां तो इंग्रजांच्या आश्रयास गेला. इंग्रजांनीं राघोबाचा पक्ष घेतला. नंतर इंग्रज व मराठे ह्यांमध्यें ज्या लढाया झाल्या त्यांस इतिहासांत 'मराठ्यांशीं पहिलें युद्ध' असें ह्मणतात. शेवटीं सन १७८२ मध्यें सालपें येथें तह होऊन इंग्रजांस राघोबाचा पक्ष सोडावा लागला. ह्या तहाप्रमाणें राघोबास दरमहा २५ हजार रुपये पेनशन मिळालें. नंतर तो आपल्या आवडत्या गांवीं कोपरगांव येथें येऊन राहिला.

हल्लीं कोपरगांवीं गोदावरीच्या कांठीं राघोबाचा फक्त एकच वाडा चांगल्या स्थितींत आहे. तो चित्रांत दाखविला आहे. नदीच्या पुराचें पाणी आंत शिरूं नये ह्मणून, वाड्याचा चौथरा फारच उंच बांधिला आहे व त्यास नदीच्या बाजूनें चौकोनी धक्के बांधिले आहेत, ते चित्रांत दिसत आहेत. नदीचें पात्र हल्लीं या वाड्यापासून फारच दूर गेलें आहे. नदीच्या बेटांत कचेश्वराच्या देवळानजीक राघोबाचा राहण्याचा दुसरा एक फार वाडा मोठा होता. त्या ठिकाणीं वाड्याच्या पायाच्या कांहीं खुणा मात्र हल्लीं दृष्टीस पडतात. कोपरगांवच्या पश्चिमेस तीन मैलांवर हिंगणी येथें नदीच्या कांठीं राघोबाचा आणखी एक वाडा होता, त्याच्या तीन भिंती मात्र हल्लीं उभ्या आहेत. तेथील लोक त्यास 'तीन भिंतींचा वाडा' असें ह्मणतात. राघोबा कोपरगांव येथें सन १७८४ मध्यें वारला.



७५ राघोबादादाचा वाडा—कोपरगांव.

# सरकारवाडा–नासिक.

नासिक येथील पेशव्यांच्या वाड्याचा पुढील भाग चित्रांत दिसत आहे. ह्या वाड्यास हल्लीं ' सरकार–वाडा ' असें ह्मणतात. महाराष्ट्रांत नासिक हें प्रसिद्ध क्षेत्र आहे. मराठेशाहींत ह्या क्षेत्राचें वैभव पुष्कळच वाढलें. हल्लीं नासिक व पंचवटी ह्यांत असणारीं मोठमोठीं देवळें, नदी कांठचे घाट, मठ, कुंडें वगैरे कामें मराठेशाहींत राजे-रजवाड्यांनीं केलीं. अशा क्षेत्राचे ठिकाणीं हा पेशव्यांचा वाडा सवाई माधवरावांच्या कारकीर्दींत बांधला गेला. पुढें सवाई माधवराव कांहीं काळ पुण्यास व कांहीं वेळ नासिकास येऊन राहूं लागले. हा वाडा तीन मजली असून त्याचें काम अतिशय मजबूत आहे. वाडयाचा चौथरा ( जोतें ) उंच असून त्याचे दगड काळे, घोटीव व फारच गुळगुळीत आहेत. हे दगड नासिकपासून सात मैलांवर असणाच्या भोरगडच्या डोंगरांतील प्रसिद्ध खाणींतून आणिलेले आहेत. वाडयांत पश्चिम बाजूस एक चौक आहे. वाडा आंतून पाहिला असतां त्याचें सर्व काम पूर्ण झालेलें नव्हतें असें दिसतें. पेशवाई नष्ट झाल्यावर हा वाडा इंग्रज सरकारकडे आला व त्यांत प्रथम मुलकी अमलदारांच्या कचेऱ्या भरूं लागल्या. हल्लीं वाडयाच्या पूर्वभागांत फौजदार साहेबांची कचेरी आहे. चित्रांत वाडयाचा पूर्वभाग दिसत असून त्याच्या मुख्य दरवाज्यावर पहारा करणारे दोन पोलीस शिपाई दिसत आहेत. वाडयाच्या पश्चिम बाजूच्या दुसऱ्या मजल्यावर नासिक जिल्ह्याच्या शाळाखात्याची कचेरी आहे. या वाडयास सन १९१४ सालीं आग लागून त्याचा पश्चिम व उत्तर भाग जळून गेला. परंतु सरकारनें तो पुन्हां पूर्वींच्याच पद्धतीनें बांधून काढिला आहे. हा वाडा पुराणवस्तुसंरक्षक खात्याच्या ताब्यांत देऊन ऐतिहासिक स्मारक ह्मणून तो ठेवण्याचा सरकारचाविचार आहे.

# वाड्याचे भाग–आनंदवेली–नासिक.

आनंदवेली हें एक लहानसें खेडेगांव नासिकच्या पश्चिमेस तीन मैलांवर गोदावरीच्या कांठीं आहे. थोरल्या माधवराव पेशव्यांबरोबर जेव्हां रघुनाथरावाचें पटेनासें झालें, तेव्हां इ. स. १७६४ सालीं रघुनाथराव पेशवा ह्या ठिकाणीं राहण्यास आला. या खेड्याचें मूळचें नांव चौंढस होतें. तें नांव राघोबाची स्त्री आनंदीबाई हिनें बदललें. तिनें तेथें एक वाडा बांधिला. त्याचे पडके भाग चित्रांत दाखविले आहेत. या वाड्याच्या एका भुयारांतून जवळच असलेल्या गोदावरी नदींत उतरण्यास मार्ग आहे व याच मार्गानें आनंदीबाई रोज सकाळीं पहाटेस नदीवर स्नानास जात असे असें ह्मणतात. हें स्थान आनंदीबाईचें विश्रांतिस्थान होतें. राघोबा वारल्यानंतर तिला येथें कोपरगांवाहून १७९३ त आणण्यांत आलें व ती पुढील वर्षीं वारली. तिचे दोन मुलगे दुसरा बाजीराव ( शेवटचा पेशवा ) आणि दत्तक पुत्र अमृतराव हे आनंदवेली येथें राहात होते. परंतु खर्ड्याच्या लढाईच्या वेळीं त्यांना तेथून काढून जुन्नरमधील शिवनेरी किल्ल्यांत नेण्यांत आलें. या वाड्याचे बहुतेक भाग हल्लीं नाहींसे झाले असून वाड्याच्या आंतील मुख्य इमारतीचे पडके भाग व मुख्य दरवाज्याचे दोन स्तंभ उभे असलेले चित्रांत दिसत आहेत.



७७ वाड्याचे पडके भाग—आनंदवेली, नाशिक.



७८ गोपिकाबाईचा वाडा—गंगापूर, नाशिक.

# गोपिकाबाईचा वाडा—गंगापूर—नासिक.

नासिक शहराच्या पश्चिमेस गोदावरी नदीच्या तीरीं 'गंगापूर' हें इतिहासप्रसिद्ध स्थळ आहे. हें नासिकापासून ६ मैलांवर असून तेथें नानासाहेब पेशव्यांची बायको गोपिकाबाई ही रहात होती. गोपिकाबाई ही अत्यंत मानी स्त्री होती. रघुनाथरावास वागविण्याच्या बाबतींत तिचें व तिचा मुलगा माधवराव ह्यांचें न जमल्यामुळें ती माधवरावावर रागावून पुण्याहून निघाली व नासिक क्षेत्राजवळ गंगापूर ह्या स्थळीं इ. स. १७६४ मध्यें राहण्यास आली. तेव्हांपासून मरेपर्यंत ती तेथेंच राहिली. मध्यंतरीं सवाई माधवरावाच्या मुंजीच्या वेळीं गोपिकाबाईनें पुण्यास यावें ह्मणून नाना फडणविसानें पुष्कळ खटपट केली, परंतु तिचा उपयोग झाला नाहीं.

गंगापूरजवळ गोदावरीच्या पात्रांत 'दुधस्थळी' नांवाचा धबधबा असून तें स्थान रमणीय आहे. अशा ठिकाणीं गोपिकाबाईनें स्वतःस राहण्यास एक सुंदर वाडा बांधिला व नदीस विस्तीर्ण घाट बांधून त्यानजीक यात्रेकरूंच्या सोईकरितां दोन धर्मशाळाही बांधिल्या. चित्रांत गोदावरीच्या पात्रांतील खडक, तीरावरील पायऱ्या असलेला जुना घाट, वाडयाचे तट व पडके भाग दिसत आहेत. गोपिकाबाईनें बांधिलेली एक धर्मशाळाही चित्रांत घाटावर नजरेस पडते. चित्रांत अगदीं मागील बाजूस मुख्य वाडयाच्या पडक्या भिंती दिसतात. गंगापूर येथें सोमेश्वराचें जुनें देऊळ असून दर वर्षीं श्रावण महिन्यांत दुसरे सोमवारीं तेथें यात्रा भरते.

# रंगमहाल–चांदवड.

जी. आय्. पी. रेल्वेच्या लासलगांव स्टेशनापासून ११ मैलांवर चांदवड नांवाचें नासिक जिल्ह्यांत तालुक्याचें गांव आहे. तेथें थोरले मल्हारराव होळकर ह्यांचे वेळीं बांधिलेला एक राजवाडा आहे. हा 'रंगमहाल' ह्या नांवानें प्रसिद्ध असून तो २५८ फूट लांब व १४१ फूट रुंद आहे. ह्या वाड्यास दोन चौक असून कांहीं ठिकाणीं पांच मजले आहेत. या वाड्यांत विस्तीर्ण तळघरें, प्रशस्त दिवाणखाने, भिंतींत धान्य सांठविण्याचीं मोठमोठीं कोठारें व पाणी सांठविण्याचे हौद आहेत. येथील दरबारचा मुख्य दिवाणखाना दुसऱ्या मजल्यावर असून तो अत्यंत विस्तीर्ण आहे. हाच मुख्य रंगमहाल होय. त्याची लांबी १३८ फूट, रुंदी ३२ फूट व उंची ३० फूट आहे. ह्याच्या भिंतीवर पौराणिक व ऐतिहासिक विषयांसंबंधीं फार सुंदर चित्रें काढलेलीं आहेत. वाडयाच्या खांबांवर व कमानीवर फार सुंदर कोरीव व रंगीत काम केलेलें आहे. या चित्रांवरून व रंगीत कामावरूनच या वाडयाला रंगमहाल हें नांव मिळालें. वाडयाच्या चोहों बाजूंस विस्तीर्ण जागा असून त्याच्या भोंवतीं भक्कम तट आहे. चित्रांत तटाची पुढील बाजू व त्यांतील मुख्य दरवाजा दिसत आहे. दरवाज्याची उंची २५ फूट असून त्याच्यावर २० फूट उंचीचा नगारखाना आहे. नगारखान्याच्या कमानीच्या तीन खिडक्या चित्रांत दिसत आहेत. दरवाज्याला मोठमोठे लंगरी खिळे लाविलेले आहेत. ह्या दरवाज्याचें एकंदर काम इतकें भव्य व मजबूत आहे कीं, त्याच्यापुढें उभें राहाणाऱ्याला आपण एकाद्या भुइकोट किल्ल्याच्या दारापुढेंच उभें आहों कीं काय असें वाटेल. हल्लीं हा वाडा होळकर सरकारचे ताब्यांत असून त्यांत त्यांचा गुमास्ता राहात असतो.



७९ रंगमहाल—चांदवड.



८० मालेगांवचा किल्ला.

# मालेगांवचा किल्ला.

जी. आय्. पी. रेल्वेच्या मनमाड स्टेशनापासून ईशान्य दिशेस सुमारें चोवीस मैलांवर मालेगांव नांवाचें नासिक जिल्ह्यांतील तालुक्याचें ठिकाण आहे. या गांवानजीकच मोसम अथवा मोक्षगंगा नदीचे कांठीं मालेगांवचा प्रसिद्ध भुइकोट किल्ला आहे. हा किल्ला पेशवाईंतील नारो शंकर राजे बहादर नांवाच्या सरदारानें इ० स० १७६५त बांधिला. हा किल्ला बांधण्यास दहा वर्षें लागलीं व किल्ल्याचें बांधकाम दिल्लीच्या कारागिरांनीं केलें असें म्हणतात. त्यावेळीं या किल्ल्याला नऊ दरवाजे, तीन निरनिराळे तट व अनेक बुरूज होते. बाहेरच्या तिसऱ्या तटाच्या आंत खोल खंदक होता. या किल्ल्याचा आकार चौकोनी असून प्रत्येक कोपऱ्यावर मोठे वर्तुळाकार बुरूज आहेत. किल्ल्याच्या तटाची उंची ६० फूट असून रुंदी सुमारें १७ फूट होती. हा किल्ला बळकट असून "खानदेशाची किल्ली" अशी याची ख्याती होती.

किल्ल्याचा बहुतेक भाग हल्लीं पडून गेलेला असून किल्ल्याच्या राहिलेल्या तटाचे व बुरूजाचे भाग चित्रांत दिसत आहेत. हा किल्ला पेशवाईच्या काळांत बांधिला असून पेशवाई नाहींशी होईपर्यंत पेशव्यांच्याच ताब्यांत असे. इ० स० १८१८ च्या एप्रिल महिन्यांत त्रिंबकजी डेंगळ्याचा पराभव झाल्यानंतर मॅग्डोवेल साहेबांनीं या किल्ल्याला मे महिन्यांत वेढा दिला व सुमारें पंधरा दिवस किल्ल्यांतील लोकांशीं लढून किल्ला सर केला. नंतर कांहीं दिवस किल्ल्यांत इंग्रजांनीं आपलें लष्कर ठेविलें होतें. हल्लीं किल्ल्यांत कोणी राहात नसून कांहीं मोमीन लोक आपला विणकामाचा धंदा किल्ल्यांतील मैदानांत करितात.

# थाळनेरचा किल्ला.

प० खा० जिल्ह्यांत थाळनेर गांवाच्या दक्षिणेस तापी नदीच्या कांठीं असलेला थाळनेरचा किल्ला चित्रांत दाखविला आहे. चित्राच्या मध्यभागीं किल्ल्याचें पडून गेलेलें बांधकाम दिसत आहे. चित्राच्या वरच्या बाजूस किल्ल्याचे दोन बुरूज चांगल्या स्थितींत असलेले दिसतात. किल्ल्यास एकंदर सहा बुरूज व सात दरवाजे होते असें ह्मणतात. त्यांपैकीं दोन बुरूज व दोन पडके दरवाजे मात्र आतां शिल्लक राहिले आहेत. किल्ल्याच्या सभोंवार विटांनीं बांधिलेला भक्कम कोट होता, तो आतां बहुतेक पडून गेला आहे. चवदाव्या शतकांत यादव वंशांतील रामचंद्र नांवाच्या गवळी राजानें हा किल्ला बांधिला. पुढें तो मुसलमानांच्या ताब्यांत आला.

खानदेशाचा सर्व भाग मलिकराजा फरुकी नांवाच्या सुभेदाराला जेव्हां मिळाला, त्यावेळीं त्यानें थाळनेर हीच आपली राजधानी केली. मलिकचा मुलगा नसिर हा खानदेशांत राज्य करीत असतांना गुजराथचा बादशाह पहिला अहमद यानें इ. स. १४२३ सालीं थाळनेरास वेढा दिला. पुढें महंमद बेगडा (१४९९), चेंगीसखान ( १५६६ ) व अकबर ( १६०० ) यांनीं अनुक्रमें या किल्ल्यावर हल्ले केले. मुसलमानी अमदानीनंतर हा किल्ला मराठे, पेशवे व होळकर यांच्या अमलाखालीं आला व इ. स. १८१८ सालीं सर थॉमस हिस्लॉप यानें होळकरांच्या किल्लेदाराबरोबर लढाई करून हा किल्ला सर केला. या लढाईत दोन युरोपियन अंमलदार मारले गेले. त्यांचीं दोन थडगीं किल्ल्याच्या मध्यभागीं आहेत; त्यांची दुरुस्ती सरकारांतून होत असते.



८१ थाळनेरचा किल्ला.



८२ थाळनेरचे हजिरे.

# थाळनेरचे हजिरे.

दिल्लीस तघलक घराण्यांतील राजे राज्य करीत असतांना हिंदुस्तानांत निरनिराळ्या ठिकाणीं जीं लहान लहान स्वतंत्र मुसलमानी राज्यें स्थापन झालीं, त्यांपैकींच खानदेशचें एक राज्य होतें. तें राज्य सन १३८९ मध्यें मलिकराजा फरुकी नांवाच्या सुभेदारानें स्थापन केलें. त्याच्या वंशांतील राजांस फरुकी राजे ह्मणतात. ह्या वंशांत एकंदर आठ बादशाह होऊन गेले. त्यांपैकीं शेवटचा बहादूरशाहा नांवाचा राजा खानदेशावर राज्य करीत असतांना हें राज्य अकबर बादशहानें सन १६०० मध्यें जिंकून घेतलें. ह्या राजांची राजधानी प्रथम कांहीं काळ थाळनेर येथें होती व पुढें ती ब्ऱ्हाणपूरास गेली. थाळनेर हें गांव पश्चिम खानदेशांतील शिरपूर तालुक्यांत तापी नदीच्या कांठीं आहे. येथें पूर्वीं अनेक ऐतिहासिक गोष्टी घडल्या व त्यांची साक्ष हल्लीं तेथील एक पडका भुइकोट किल्ला व चित्रांत दाखविलेल्या ‘हजिरे’ नांवाच्या इमारती देत आहेत. ह्या इमारती एकंदर आठ असून त्या तेथें पूर्वीं राज्य करणाऱ्या फरुकीवंशांतील आठ बादशाहांच्या कबरी आहेत. त्यांतील एक इमारत अष्टकोनी असून बाकीच्या चौकोनी आहेत, असें चित्रावरून दिसून येईल. ह्यांतील सर्वांत मोठी मध्यभागीं असलेली इमारत अकरा चौरस फूट असून ती पहिला बादशाह मलिकराजा याची कबर आहे. ह्यांतील सहा इमारती काळ्या दगडाच्या असून बाकीच्या दोन विटांनीं बांधिलेल्या आहेत. ह्या इमारती अतिमोठ्या व प्रेक्षणीय नसल्या तरी त्यांस बरेंच ऐतिहासिक महत्त्व आहे. कारण, या इमारती ज्या आठ बादशाहांच्या कबरी आहेत त्यांनीं खानदेशांत राहून महाराष्ट्राच्या कांहीं भागावर पूर्वीं सुमारें २०० वर्षें राज्य केलें होतें.

# पारशी लोकांचा स्मारकस्तंभ-संजाण.

पारशी लोक मूळचे इराण देशांतील राहाणारे असून झरतुष्ट ह्यानें स्थापिलेल्या धर्माचे अनुयायी होत. मुसलमानी धर्माचा संस्थापक पैगंबर महंमद ह्याच्या निधनानंतर त्याच्या अनुयायांनीं ( अरबांनीं ) सन ६४१ मध्यें इराणवर स्वारी केली व पारशांचा राजा जो यज्दज़ीर्द त्याचा लढाईंत पूर्ण पराभव केला. त्यानंतर सर्व इराण देश मुसलमानांच्या ताब्यांत गेला व कांहीं पारशी लोक मुसलमान झाले. जे थोडे लोक आपला धर्म संभाळून तेथें राहिले, त्यांस मुसलमान त्रास देऊं लागले. तेव्हां त्यांतील कांहीं लोक इराणी आखातांतील ऊर्मझ् बेटांत जाऊन राहिले. परंतु तें बेटही जेव्हां मुसलमानांनीं घेतलें, तेव्हां धर्मांतर करण्यापेक्षां देशांतर करणें चांगलें असें समजून त्यांनीं जलमार्गानें हिंदुस्तानची वाट धरिली. इ. स. ६९८ मध्यें पारशी लोकांची पहिली टोळी ऊर्मझ् बेटांतून निघून काठेवाडच्या किनाऱ्यास दीव बेटांत येऊन पोहोंचली. तेथें ते लोक १९ वर्षं राहिले. पुढें ते हिंदुस्तानांत यावयास निघाले व प्रथम ठाणें जिल्ह्यांतील संजाण बंदरांत उतरले. ह्या गोष्टीच्या स्मरणार्थ पारशी लोकांनीं ठाणें जिल्ह्यांतील उंबरगांव पेट्यांत संजाण येथें एक स्तंभ उभारिला. तो चित्रांत दाखविला आहे. एका मोठ्या दगडी चौथऱ्यावर हा स्तंभ बांधिलेला आहे. त्याच्या उंचीची कल्पना बाजूस उभा असलेल्या मनुष्याच्या उंचीवरून करितां येईल. स्तंभाच्या शिखरावर पारशी लोकांना पूज्य अशा अग्नीचें कुंड दाखविलें आहे. स्तंभाच्या बाजूस जी चौकोनी जागा दिसत आहे, तीवर पारशी लोकांच्या ह्या आगमनाची सर्व हकीकत कोरलेली आहे.



८३ पारशी लोकांचा स्मारकस्तंभ—संजाण.



८४ वसईचा किल्ला.

# वसईचा किल्ला.

वसईचा इतिहासप्रसिद्ध किल्ला ठाणें जिल्ह्यांत वसईपासून एक मैलावर आहे. हा किल्ला गुजराथचा सुलतान महंमद बेगडा यानें १४७० च्या सुमारास बांधिला. ज्या वेळीं दिल्लीचा मोंगल बादशाहा हुमायून ह्यानें गुजराथेवर स्वारी केली, त्यावेळीं गुजराथचा सुलतान बहादुरशाहा ह्यानें हुमायुनाशीं लढण्याकरितां पोर्तुगीज लोकांची मदत मागितली व त्यांच्या मदतीनें हुमायुनाचा पराभव केला. या त्यांच्या मदतीची फेड ह्मणून त्यानें पोर्तुगीज लोकांस इ० स० १५३४ सालीं वसईगांव इनाम दिला. नंतर पोर्तुगीज लोकांनीं तेथें इ. स. १५३६ त किल्ल्याचे नवीन मजबूत बांधकाम केलें. नंतर वसई हें पोर्तुगीज लोकांचें उत्तर किनाऱ्यावरील एक मुख्य ठिकाण झालें व तें पुढें २०० वर्षेपर्यंत त्यांच्याच ताब्यांत राहिलें. या दोन शतकांच्या काळांत त्यांनीं किल्ल्यांत अनेक प्रचंड इमारती बांधिल्या. पुढें इ. स. १७३९ मध्यें बाजीराव पेशव्याचा भाऊ चिमाजीआप्पा ह्यानें वेढा देऊन हा किल्ला पोर्तुगीज लोकांपासून जिंकून घेतला.

चित्रांत समुद्रावरून दिसणारा ह्या किल्ल्याचा देखावा दिसत आहे. किल्ल्याच्या तीन बाजूंस समुद्र असून चौथी बाजू किनाऱ्यास लागलेली आहे. ह्या किल्ल्यास समुद्राच्या बाजूनें एक व जमिनीच्या बाजूनें एक असे दोन दरवाजे आहेत. किल्ल्याचा तट हल्लीं बहुतेक शाबूत असून त्याचा घेर दीड मैल आहे. तटाची उंची ३० फूट आहे. हल्लीं किल्ल्यांत वस्ती नाहीं. जिकडे तिकडे ताड व इतर वृक्ष, झुडपें व वेली, ह्यांचें रान माजलें आहे. मधून मधून जुन्या रस्त्यांचे भाग, उंच पडक्या इमारती, थडगीं व प्रार्थनामंदिरें यांचेही भाग दिसून येतात.

# अलिबागचा किल्ला.

कुलाबा जिल्ह्यांतील अलिबाग बंदराच्या नैर्ऋत्य दिशेस समुद्रांत बांधिलेला अलिबागचा किल्ला चित्रांत दाखविला आहे. या किल्ल्याची लांबी सुमारें ९०० फूट असून त्याची रुंदी ३५० फूट आहे. किल्ल्याच्या सभोंवतीं २५ फूट उंचीचा बळकट तट असून त्यांत दोन दरवाजे व सतरा प्रचंड बुरूज आहेत. किल्ल्याच्या पूर्व बाजूचे तट व बुरूज चित्रांत दिसत आहेत. सतराव्या शतकाच्या उत्तरार्धांत शिवाजी महाराजांच्या राज्याचा विस्तार कोंकणांत बराच झाला. तेव्हां अलिबागचा किल्ला त्यांनीं आपल्या ताब्यांत घेऊन त्याची दुरुस्ती व बळकटी केली व आपल्या कोंकणांतील राज्याच्या संरक्षणार्थ प्रथम त्यांनीं तें आपलें मुख्य आरमारी ठिकाण केलें. पुढें इ० स० १६९८ च्या सुमारास कोंकणांतील मराठेशाहीच्या आरमारावरील मुख्य जागा कान्होजी आंग्रे यास मिळाली. हा अति शूर व मोठा कर्तबगार असा अधिकारी झाला व त्याच्याच कारकीर्दींत अलिबागचा किल्ला फार प्रसिद्धीस आला. इंग्रज व पोर्तुगीज या दोघांनीं मिळून या किल्ल्याला इ० स० १७२२ त वेढा दिला पण त्यांत त्यांना यश आलें नाहीं. इ० स० १७४७ त जंजिऱ्याच्या शिद्दीनें या किल्ल्यावर बरेंच मोठें आरमार पाठविलें पण त्याचा पराभव झाला. इ० स० १७५९ च्या सुमारास रघुजी आंग्रे याजकडे हा किल्ला आला. पुढें हा किल्ला मराठ्यांनीं आपल्या ताब्यांत घेतला व इ० स० १८१७ त हा इंग्रजांच्या स्वाधीन झाला.



८५ अलिबागचा किल्ला.



८६ जंजिरा किल्ला—मुरुड.

# मुरूड-जंजिरा.

मुरूडजंजिरा नांवाचा इतिहासप्रसिद्ध किल्ला कुलाबा जिल्ह्यांत जंजिरा संस्थानांतील दंडाराजपुरी नांवाच्या एका मोठ्या खाडीच्या तोंडाशीं समुद्रांतील एका खडकावर बांधिलेला आहे. ह्या किल्ल्याच्या उत्तरेस किनाऱ्यावर जंजिरा संस्थानचें राजधानीचें शहर मुरूड हें आहे. हा जलदुर्ग बराच जुना आहे. पूर्वींच्या हिंदुराजांपासून अहमदनगरच्या बादशाहानें हा किल्ला सन १४९० सालीं जिंकून घेतला. पुढें त्या बादशाहानें ह्या किल्ल्यावर शिद्दी जातीचे सुभेदार नेमिले. त्यांपैकीं शिद्दी अंबर सनक हा सुभेदार सन १७३६ त स्वतंत्र झाला. तेव्हांपासून हा किल्ला त्याच्या वंशजांच्या ताब्यांत आहे.

हा किल्ला जिंकण्याचे मराठ्यांनीं अनेक वेळां प्रयत्न केले. शिवाजी महाराजांनीं या किल्ल्यावर दोन वेळां स्वारी केली. परंतु त्यांत त्यांना यश आलें नाहीं. पुढें पेशवाई बुडाल्यावर जेव्हां कोंकणपट्टी इंग्रजांच्या ताब्यांत आली, तेव्हां जंजिऱ्याचा शिद्दी इंग्रजांचा मांडलिक झाला. चित्रांत समुद्राचे बाजूनें घेतलेला किल्ल्याचा देखावा दिसत आहे. किल्ल्याचा तट सुमारें ५० फूट उंच असून त्यास मधून मधून १९ बुरूज आहेत. तटास पूर्वेच्या बाजूस एक भव्य दरवाजा आहे. हें तटबंदीचें काम शिद्दी सुरूलखान ह्यानें १७०७ च्या सुमारास केलें. हें काम आज बरेंच शाबूत आहे. किल्ल्यांत ठिकठिकाणीं बऱ्याच लहान मोठ्या तोफा दिसून येतात. पूर्वेकडील मुख्य दरवाज्यावरील तोफ १८ फूट लांबीची व ८ फूट घेराची आहे. चित्रांत मध्यभागीं जो सर्वांत उंच भाग दिसत आहे, तो समुद्रसपाटीपासून २०० फूट उंच आहे. पूर्वी लढाईमध्यें ह्या ठिकाणावरून तोफांचा मारा करीत असत.

# इंग्रजांची जुनी वखार—राजापूर.

राजापूर हें तालुक्याचें ठिकाण रत्नागिरी जिल्ह्यांत समुद्रकिनाऱ्यापासून पंधरा मैलांवर जैतापूर खाडीच्या कांठीं आहे. पूर्वीं हें व्यापाराचें मोठें प्रसिद्ध ठिकाण होतें; व तेथें गुजर व्यापाऱ्यांच्या मोठ्या पेढ्या व वखारी होत्या. ह्याच गांवीं इंग्रजी ईस्ट इंडिया कंपनीनें इ. स. १६४९ सालीं एक वखार बांधिली. ही दुमजली वखार व तिचे बुरूज चित्रांत दिसत आहेत. वखारीची इमारत हल्लीं चांगल्या स्थितींत आहे. वखारीच्या आवारांत ईशान्येकडे एक जुनी विहीर आहे. हल्लीं ह्या इमारतीच्या वरच्या मजल्यावर मामलेदार कचेरी असून खालच्या मजल्यांत खजिना व तात्पुरत्या मुदतीचे कैदी ठेवण्याचा तुरुंग आहे. ही राजापूरची वखार शिवाजीनें इ. स. १६६१ व १६७० ह्या सालीं लुटली. पुढें इ. स. १७०८ सालापासून ही वखार बंद पडली. अशा प्रकारच्या व्यापारी वखारींतच इंग्रजांच्या भावी साम्राज्याचें बीज होतें. पुढें ह्या बीजाचा वृक्ष कसा झाला व ही व्यापारी कंपनी 'सरकार' कशी बनली, हें इतिहासांत प्रसिद्धच आहे. इंग्रजांप्रमाणेंच त्यावेळीं यूरोपांतील हॉलंड, पोर्तुगाल, फ्रान्स, वगैरे देशांतील लोकांनीं निरनिराळ्या व्यापारी कंपन्या स्थापून ते हिंदुस्तानांत व्यापार करूं लागले. त्यांनींही हिंदुस्तानांत निरनिराळ्या ठिकाणीं वखारी बांधिल्या. परंतु त्यांचें इंग्रजांपुढें कांहीं चालेनासें होऊन हळूहळू त्यांचा व्यापार व वखारी नाहींशा झाल्या; व हिंदुस्तानचा बहुतेक व्यापार इंग्रजांच्या हातीं येऊन क्रमाक्रमानें बराच मुलुखही त्यांनीं मिळविला. पुढें मोठ्या युक्तीनें हिंदुस्तानचें सार्वभौम राज्यही त्यांनीं मिळविलें.



८७ इंग्रजांची जुनी वखार–राजापूर.



८८ विजयदुर्ग.

# विजयदुर्ग.

रत्नागिरी जिल्ह्यांतील देवगड तालुक्यांत वाघोटन खाडीच्या मुखाजवळ विजयदुर्ग नांवाचें एक बंदर आहे. त्या खाडीच्या दक्षिण बाजूस समुद्रांत गेलेल्या एका शंभर फूट उंचीच्या टेकडीवर चित्रांत दिसणारा विजयदुर्गचा किल्ला आहे. हा किल्ला बराच जुना असून पूर्वीं मुसलमानी अमदानींत बांधिला गेला. शिवाजीनें विजापूरकरांपासून हा किल्ला जिंकून घेतला, तेव्हां त्याची बांधणी विशेष मजबूतीची नव्हती. शिवाजीनें तो उत्तम प्रकारें बांधून अजिंक्य असा बनविला. त्यानें किल्ल्याभोंवतीं अत्यंत मजबूत तट व त्याला ठिकठिकाणीं भव्य व उंच बुरूज बांधिले. तसेंच किल्ल्यांत इमारतीही बांधिल्या. शिवाजीच्या पश्चात् सन १६९८ सालीं हा किल्ला आंग्रे यांच्या ताब्यांत गेला. त्यांनीं विजयदुर्ग हें आपल्या आरमाराचें मुख्य ठिकाण केलें. पुढें पन्नास वर्षेपर्यंत आंग्रे यांच्या आरमारानें कोंकण किनाऱ्यावर अंमल चालविला. इंग्रज, फ्रेंच व डच ह्यांनीं दोन तीन वेळां विजयदुर्ग काबीज करण्याचा प्रयत्न केला. परंतु किल्ला अत्यंत मजबूत असल्यामुळें त्यांस यश आलें नाहीं. पुढें आंग्रे मराठेशाहीस न जुमानतां स्वतंत्र रीतीनें वागूं लागले ह्मणून शेवटीं सन १७५६ सालीं इंग्रज व पेशवे ह्यांनीं एकत्र मिळून समुद्रावरून व जमिनीवरून मारा करून हा किल्ला सर केला. पुढें पेशवाई नष्ट झाल्यावर हा किल्ला इंग्रजांचे ताब्यांत आला. चित्रांत किल्ल्याचे प्रचंड तट व उंच बुरूज दिसत आहेत. किल्ल्यामध्यें उत्तम पाण्याच्या विहिरी व वस्ती करण्यासारख्या जुन्या इमारती आहेत. त्यांपैकीं एक इमारत चित्रांत डाव्या बाजूकडे दोन बुरूजांमध्यें दिसत आहे चित्रांत उजव्या बाजूसही किनाऱ्याजवळ दोन लहान इमारती दिसतात. तेथें आगबोटीचें तिकिट ऑफिस आहे.

# सिंधुदुर्ग—मालवण.

मालवण हें तालुक्याचें गांव रत्नागिरी जिल्ह्याच्या दक्षिणेस असून तें समुद्रकांठीं एक प्रसिद्ध बंदर आहे. कोंकणपट्टींत शिवाजीच्या राज्याचा विस्तार होऊं लागल्यावर समुद्रकिनाऱ्याच्या बंदोबस्ताकरितां व राज्याच्या संरक्षणासाठीं एका मजबूत किल्ल्याची त्यास आवश्यकता भासूं लागली. ह्मणून प्रथम शिवाजीनें शिद्दीच्या ताब्यांतील अत्यंत मजबूत असा जंजिरा जिंकण्याचा दोन वेळां प्रयत्न केला, परंतु त्यांत त्यास यश आलें नाहीं. ह्मणून त्यानें मालवण बंदर पसंत करून तेथें इ० स० १६६४ सालीं किनाऱ्यापासून पश्चिमेस एक मैलावर कुरटे बेटांत 'सिंधुदुर्ग' नांवाचा किल्ला बांधिला. हा किल्ला त्या काळीं शिवाजीच्या आरमाराचें व कोंकणपट्टींतील राज्यव्यवस्थेचें मुख्य ठिकाण होतें. चित्रांत ह्या किल्ल्याच्या मुख्य दरवाज्याचा देखावा दिसत आहे. ह्या किल्ल्याचा घेर सुमारें दोन मैल असून त्याला ठिकठिकाणीं ३२ बुरूज आहेत. तटाची उंची ३० फूट व रुंदी १२ फूट आहे. हल्लीं ह्या किल्ल्याची तटबंदी बऱ्याच ठिकाणीं पडून गेली आहे व किल्ल्यांतील पूर्वीच्या इमारती नष्ट झाल्या आहेत. किल्ल्यांत शिवाजीचें जुनें मंदीर होतें. त्याची दुरुस्ती कोल्हापूरचे कै० शाहूमहाराज ह्यांनीं इ० स० १९०७ सालीं करून त्यापुढें एक सभामंडप बांधिला आहे. मंदिरांत शिवाजीची जुनी दगडी मूर्ति आहे. ह्या मंदिराच्या खर्चाकरितां कोल्हापूर सरकारकडून दरसाल १५०० रुपयांची नेमणूक आहे.



८९ सिंधुदुर्ग—मालवण.



९० डच लोकांची जुनी वखार–वेंगुर्लें.

# डच लोकांची जुनी वखार—वेंगुर्लें.

हिंदुस्तानचा परदेशी व्यापार इ० स० १५०० ते इ० स० १६०० पर्यंत पोर्तुगीज लोकांच्या ताब्यांत होता. ह्या व्यापारांत पोर्तुगीज लोकांना फार नफा मिळूं लागला हें पाहून यूरोपांतील हॉलंड, इंग्लड, फ्रान्स वगैरे देशांतील व्यापारीही कंपन्या स्थापून हिंदुस्तानांत व्यापाराकरितां आले. ह्यांपैकीं हॉलंडमधील डच लोक १७ व्या शतकांत फार प्रबल होऊन त्यांनीं पोर्तुगीजांचा व्यापार व वसाहती आपल्या ताब्यांत आणिल्या. डचांनीं हिंदुस्तानाजवळ मलाका, जावा, सुमात्रा, सिलोन वगैरे ठिकाणीं आपली सत्ता स्थापून तेथील व्यापार पूर्णपणें आपल्या ताब्यांत घेतला. तसेंच हिंदुस्तानाच्या निरनिराळ्या भागांतील चिनसुरा ( बंगाल ), नागापट्टण ( मद्रास ), पुलिकत ( मद्रास ), वगैरे ठिकाणें घेऊन तेथेंही त्यांनीं आपल्या वखारी घातल्या. कोंकणपट्टींतही त्यांनीं व्यापार वाढविण्याचा प्रयत्न केला. त्याकरितां त्यांनीं रत्नागिरी जिल्ह्याच्या दक्षिण टोंकास वेंगुर्लें बंदरांत सन १६३८ सालीं एक वखार बांधिली. चित्रांत ह्या वखारीचा देखावा दिसत आहे. हिची बांधणी दगडी असून सभोंवतीं मजबूत तटबंदी आहे. चित्रांत बाहेरील तटबंदी व आंतील वखारीची उंच इमारत दिसत आहे. पुढें अठराव्या शतकांत इंग्रजांची ‘ ईस्ट इंडिया कंपनी’ प्रबल होऊन तिनें हिंदुस्तानांतील डचांचा व्यापार व ठाणीं आपले ताब्यांत घेतलीं. ह्यामुळें वेंगुर्लें येथील व्यापारही डचांचे हातून गेला. हल्लीं ह्या इमारतींत सरकारी कचेऱ्या भरत असतात.

# भाग तिसरा.

## मुख्य पवित्र स्थळें.

महाराष्ट्रांतील मुख्य पवित्र स्थळें नकाशांत दाखविलीं आहेत. ह्या स्थळांना पावित्र्य आणणारीं कारणें मुख्यतः चार प्रकारचीं दिसून येतात. तीं १ पवित्र नद्यांचें सान्निध्य, २ पौराणिक कथा-संबंध, ३ विशिष्ट देवतांचें स्थान व ४ साधुसंतांचा निवास हीं होत. बरींच पवित्र स्थळें महानद्यांच्या उगमस्थानीं, कांठीं अगर संगमांवर आहेत असें दिसून येईल. महाबळेश्वर, भीमाशंकर, त्र्यंबकेश्वर, वाई, नासिक, नरसोबाचीवाडी, माहुली, प्रवरासंगम वगैरे स्थळें पहिल्या वर्गांत येतात. पौराणिक ग्रंथांत वर्णन केलेलीं परशुरामक्षेत्र, हरेश्वरक्षेत्र इत्यादि स्थळें हीं दुसऱ्या वर्गांत मोडतात. कोल्हापूर, सिंगणापूर, चिंचवड, जेजूरी, पंढरपूर, सप्तशृंग, वज्रेश्वरी, पुळें इत्यादि तिसऱ्या वर्गांतील स्थळें तेथील विशिष्ट देवतांमुळें प्रसिद्धीस आलीं आहेत. महाराष्ट्रांत तेराव्या शतकापासून ते सतराव्या शतकापर्यंत अनेक साधुसंत होऊन गेले. त्यांची जन्मभूमि, निवासस्थळ अगर समाधिस्थान म्हणून कांहीं स्थळांना पावित्र्य आलें आहे. औदुंबर, परळी, आळंदी, देहू, सासवड, पुणतांबें, अमळनेर, निर्मळ हीं अशा प्रकारचीं चौथ्या वर्गांतील स्थळें होत. मुख्य पवित्र स्थळें दाखविलेल्या महाराष्ट्राच्या नकाशांत सातारा, पुणें व नासिक ह्या जिल्ह्यांत विशेष पवित्र स्थळें आहेत असें दिसून येईल. कारण, महाराष्ट्रांतील महानद्यांचीं उगमस्थानें ह्या तीन जिल्ह्यांत असून येथेंच बहुतेक साधुसंत उदयास आले.

पवित्र स्थळें.

नंदुरबार
धुळें
अमळनेर
एदलाबाद
जळगांव
सप्तशृंग
नाशिक
त्र्यंबक
पुणतांबे
प्रवरासंगम
वज्रेश्वरी
निर्मळ
ठाणें
कुर्ला
भीमाशंकर
नगर
देहू
आळंदी
कनकेश्वर
अलिबाग
चिंचवड
पुणें
सासवड
जेजुरी
वांई
सोलापूर
हरेश्वर
महाबळेश्वर
शिंगणापूर
पंढरपूर
सातारा
चिपळूण
परळी
माहुली
पुळें
रत्नागिरी
औदुंबर
जोतिबा
कोल्हापूर
नृसिंहवाडी.
राजापूर

९१ मुख्य पवित्र स्थळें.



९२ अंबाबाईचें देऊळ—कोल्हापूर.

# अंबाबाईचें देऊळ—कोल्हापूर.

कोल्हापूर अथवा करवीर हें क्षेत्र पंचगंगा नदीच्या कांठीं आहे. ह्यास 'दक्षिण काशी' असें म्हणतात. येथें पुष्कळ तीर्थें व देवळें आहेत. ह्या क्षेत्राची मुख्य देवता अंबाबाई अथवा महालक्ष्मी होय. तिचें देऊळ शहराच्या मध्यभागीं जुन्या राजवाड्यानजीक असून फार भव्य व प्राचीन आहे. चित्रांत ह्या देवळाचा उत्तरेकडून दिसणारा देखावा दिसत आहे. देवळासमोर सभामंडप आहे. तो सन १८४० च्या सुमारास बांधिला. त्याच्यामागें तीन उंच कळस दिसत आहेत. सर्वांत मोठा कळस अंबाबाईच्या मुख्य देवळाचा आहे. ह्या देवळाचें सर्व काम दगडी असून तें बांधतांना चुन्याचा उपयोग कोठेंही केलेला दिसत नाहीं. देवळाच्या आवाराभोंवतीं तट असून आंत दुसऱ्या देवतांचीं देवळें व तीर्थें आहेत. आवारांत सर्वत्र फरसबंदी केलेली असून आंत दोन मोठाले पाण्याचे हौद आहेत. चित्रांत मध्यभागीं कारंजें असलेला एक हौद व त्याच्या पलीकडे दीपमाळा दिसत आहेत.

ह्या देवळाची बांधणी, भिंतीवरील कोरीव दगडी मूर्ती व नक्षीकाम ह्यांवरून हें देऊळ मूळ जैनांचें असावें असें अनुमान होतें. ह्या देवळांत चार शिलालेख आहेत, त्यांतील सर्वांत प्राचीन शके ११४० चा आहे. त्यावरून हें देऊळ शिलाहार वंशांतील राजांनीं बांधिलें असावें असें दिसतें. मोठ्या शिखराच्या खालीं गाभाऱ्यांत अंबाबाईची कृष्णपाषाणाची पश्चिमाभिमुख सुंदर मूर्ति आहे. तिच्या बाहेरील दालनांत उजवे व डावे बाजूस अनुक्रमें महाकाली व महासरस्वती ह्यांच्या मूर्ती असून समोर गजाननाची मूर्ति आहे. अंबाबाईच्या गाभाऱ्यांत पुरेसा उजेड नसल्यामुळें तेथें दिवसाही दिवे लावलेले असतात. ह्या देवस्थानास ५००० रुपयांचें वर्षासन आहे.

# जोतिबाचें देऊळ–कोल्हापूर.

कोल्हापूरच्या उत्तरेस सुमारें अकरा मैलांवर जोतिबाची टेकडी आहे. तिची उंची समुद्रसपाटीपासून अदमासें ३००० फूट आहे. तिच्या माथ्यावर जोतिबाचें प्रसिद्ध देऊळ आहे. ह्या देवळाभोवतीं टेकडीवरच वाडी–रत्नागिरी नांवाचें तीनचारशें घरांचें एक खेडें आहे. ह्या खेड्यांत जोतिबाचे पूजारी व गुरव ह्यांचीच मुख्य वस्ती आहे. जोतिबा हा शंकराचा अवतार असून त्यास केदारेश्वर असेंही ह्मणतात. महाराष्ट्रांतील अनेक घराण्यांचा व ग्वाल्हेरच्या शिंद्यांचा हा कुलस्वामी आहे. प्राचीनकाळीं श्रीमहालक्ष्मीच्या विनंतीवरून दक्षिणेकडील दैत्यांचा संहार करण्याकरितां हिमालयांतून शंकर दक्षिणेकडे आले. त्यांनीं रत्नासुरादि असुरांचा वध केल्यानंतर जोतिबाच्या टेकडीवर दक्षिणाभिमुख असें कायमचें वास्तव्य केलें. तेव्हांपासून हें स्थान प्रसिद्धीस आलें.

जोतिबाचें देऊळ निळसर रंगाच्या दगडांनीं बांधिलेलें असून त्यावर उत्तम खोदकाम केलेलें आहे. केदारेश्वराच्या जुन्या देवळाचा जीर्णोद्धार करून त्या ठिकाणीं हल्लीं असणारें भव्य देवालय राणोजीराव शिंदे ह्यांनीं सन १७३० त बांधिलें. चित्रांत या देवळाचीं दोन उंच शिखरें, त्यांवरील नक्षीकाम, दीपमाळा व महाद्वार ह्यांचा देखावा दिसत आहे. हें देऊळ ५७ फूट लांब, ३७ फूट रुंद व ७७ फूट उंच आहे. ह्याचा सभामंडप प्रसिद्ध सरदार महादजी शिंदे ह्यांनीं बांधिला. दरवर्षी चैत्र शुद्ध पौर्णिमेस जोतिबाची फार मोठी यात्रा भरते. येथील देवस्थानाला १२००० रुपयांचें वर्षासन आहे.




९३ जोतिबाचें देऊळ—कोल्हापूर.




९४ दत्ताचें देऊळ—नरसोबाची वाडी.

# दत्ताचें देऊळ–नरसोबाची वाडी.

महाराष्ट्रांत श्रीगुरुदत्ताचीं जीं स्थानें आहेत, त्यांपैकीं नरसोबाची वाडी हें एक मुख्य होय. हें क्षेत्र कोल्हापूर संस्थानांतील शिरोळ गांवापासून तीन मैलांवर कृष्णा व पंचगंगा ह्या नद्यांच्या संगमावर आहे. मिरज–कोल्हापूर या आगगाडीच्या रस्त्यावरील शिरोळरोड स्टेशनापासून हें क्षेत्राचें गांव नऊ मैल आहे. ह्या क्षेत्रास पूर्वीं अमरपूर असें ह्मणत. प्रसिद्ध साधु नृसिंहसरस्वती हे येथें सुमारें एक तप राहिले; ह्मणून ह्या स्थानास नंतर नरसोबाची वाडी ( नृसिंहवाडी ) असें म्हणूं लागले. ह्या क्षेत्राचें वर्णन कृष्णामाहात्म्य व गुरुचरित्र ह्या ग्रंथांत केलेलें आहे.

चित्रांत कृष्णानदीचें पात्र तिच्या कांठावरील उंच घाट, ओंवऱ्या, देवळें व धर्मशाळा ह्यांचा सुंदर देखावा दिसत आहे. ज्या ठिकाणीं चित्रांत निशाण दिसत आहे तेथें खालीं दत्ताच्या मुख्य पादुका आहेत. हें स्थान फार पवित्र असून जागृत असल्यामुळें येथें आपल्या इच्छा पूर्ण व्हाव्या ह्मणून दत्ताची सेवा करण्यास पुष्कळ लोक राहिलेले असतात. तसेंच भूतपिशाच्चादिकांच्या बाधेनें त्रस्त झालेले व व्याधिग्रस्त लोकही येथें आपणांस गूण यावा ह्मणून देवाची उपासना करण्यास येतात. येथें दरसाल गुरुद्वादशीनिमित्त आश्विन वद्य द्वादशीस मोठी यात्रा भरते. त्या वेळीं देवाच्या उत्पन्नांतून मुक्तद्वार अन्नसंतर्पण होतें. दत्ताच्या पालखीचा थाट पाहाण्यासारखा असतो. ह्या देवस्थानास दोन गांवें इनाम असून त्यांच्या उत्पन्नांतून देवस्थानाचा नित्य व नैमित्तिक खर्च चालतो. शिवाय यात्रेकरूंकडूनही बरीच प्राप्ति होते.

# दत्ताचें देऊळ–औदुंबर

औदुंबर हें क्षेत्र सातारा जिल्ह्यांतील तासगांव तालुक्यांत मिलवडी गांवानजीक कृष्णानदीच्या कांठीं आहे. नरसोबाच्यावाडीप्रमाणेंच येथील श्रीदत्ताचें स्थान जागृत ह्मणून प्रसिद्ध आहे. गुरुचरित्रांत ह्या क्षेत्राचें माहात्म्य वर्णन केलें आहे. ह्या क्षेत्राच्या भागांत औदुंबराचे [ उंबराचे ] वृक्ष पुष्कळ असल्यामुळें ह्याला ' औदुंबर ' असें नांव पडलें आहे. उंबराचे कांहीं वृक्ष चित्रांत दिसत आहेत. वृक्षांच्या मध्यभागीं जें देऊळ दिसत आहे तेंच दत्ताचें देऊळ होय. त्यांत दत्ताच्या पादुका ठेवलेल्या आहेत. देवळाच्या सभोंवार सेवेकरी लोकांस राहाण्यासाठीं धर्मशाळा बांधिलेल्या आहेत. मंदिराच्या पुढील बाजूनें कृष्णानदी वाहते. नदींत उतरण्याकरितां प्रशस्त दगडी घाट बांधिलेला आहे. नदीची प्रशांत शोभा, दाट झाडी व देवाच्या सेवेकरितां जमलेला जनसमूह पाहून मन सुप्रसन्न होतें. नरसोबाच्यावाडीप्रमाणेंच कुष्टरोगग्रस्त व भूतपिशाच्चांनीं पीडित असे लोक येथें देवाच्या सेवेकरितां येऊन राहतात. श्रद्धावान् लोकांस देवाच्या सेवाप्रसादानें इष्ट फल मिळतें असें ह्मणतात. औदुंबरास गुरुद्वादशी [ आश्विन वद्य द्वादशी ] व दत्तजयंति [ मार्गशीर्ष शुद्ध पौर्णिमा ] निमित्त फार मोठी यात्रा भरते. त्या वेळेचा येथील प्रसादाचा देखावा फार प्रेक्षणीय असतो. शेंकडों लोक प्रसाद घेण्याकरितां जमलेले दिसतात. येथील सायंकाळच्या आरतीचा समारंभही दर्शनीय असतो. ह्या क्षेत्रीं श्रीदत्ताच्या मंदिराखेरीज कांहीं मठ, समाधि, मंदिरें पाहाण्यासारखीं आहेत. मद्रास व सदर्न मराठा रेल्वेच्या मिलवडी स्टेशनापासून औदुंबरास जाण्याकरितां वाहनें मिळतात.



९५ दत्ताचें देऊळ—औदुंबर.



९६ कृष्णाबाईचें देऊळ—महाबळेश्वर.

# कृष्णाबाईचें देऊळ-महाबळेश्वर.

महाबळेश्वर हें प्राचीन क्षेत्राचें व अर्वाचीन काळांतील हवा खाण्याचें ठिकाण सातारा जिल्ह्यांत सह्याद्रीच्या ४५०० फूट उंचीच्या एका शिखरावर आहे. हल्लींच्या नवीन शहरापासून ( मालकमपेठेपासून ) हें जुनें महाबळेश्वर ( क्षेत्र महाबळेश्वर ) उत्तरेस तीन मैलांवर आहे. येथें महाबळेश्वर, अतिबळेश्वर व कृष्णाबाई ह्यांचीं फार जुनीं देवळें आहेत. कृष्णाबाईचें देवालय एखाद्या वाड्याच्या चौकाप्रमाणें दिसतें. चित्रांत ह्या देवळाचा आंतील मुख्य भाग दाखविला आहे. देवळाचें सर्व काम काळ्या दगडांनीं केलेलें असून फारच मजबूत आहे. ह्याच देवळांत कृष्णानदी उगम पावते असें ह्मणतात. नदीच्या उगमाकडील बाजूस ह्या देवळाची जी दगडी भिंत आहे, तिच्या तळाशीं, तीन तीन फूटांच्या अंतरावर, पांच लहान द्वारें आहेत; त्यांतून पांच प्रवाह वाहात येतात व ते पुढें एकत्र होऊन एका गायमुखांतून देवळाच्या मध्यभागीं असलेल्या ब्रह्मकुंडांत पडतात. गाईच्या मुखांतून पाणी खालीं ब्रह्मकुंडांत पडत आहे, असा देखावा चित्रांत दिसत आहे. हें कुंड फार पवित्र समजलें जातें. ह्या देवळांत दरवर्षी फाल्गुनांत कृष्णाबाईचा उत्सव होतो. देवळास ९० रुपयांचें सरकारी वार्षिक उत्पन्न चालू आहे. ह्या देवळांत कृष्णानदीचा उगम होतो ह्मणून ह्यास कृष्णाबाईचें देऊळ असें ह्मणतात. महाबळेश्वरांत उगम पावणाऱ्या बाकीच्या तीन नद्या वेण्या, कोयना, सावित्री ह्याच ब्रह्मगिरी डोंगरावर इतर ठिकाणीं उगम पावतात व पांचवी गायत्री हिचें अस्तित्व केवळ पुराणांतच आहे. कृष्णानदी ही महाबळेश्वरांत उगम पावून पुढें सातारा जिल्ह्यांतून वाहात जाते. तिच्या कांठावरील कांहीं स्थळांची क्षेत्रांत गणना होते. त्यांपैकींच वाई हें एक क्षेत्र आहे.

# नदी व देवळें-वाई.

**वाई** हें क्षेत्र कृष्णानदीच्या उत्तर तीरावर वसलें असून तें मद्रास आणि सदर्न मराठा रेल्वेच्या वाठार स्टेशनापासून २० मैल आहे. कृष्णाकांठीं जीं अनेक क्षेत्रें आहेत, त्यांमध्यें वाईचें महत्त्व विशेष आहे. वाई हीच पुराणप्रसिद्ध विराटनगरी असून तेथें पांडव अज्ञातवासांत राहात होते असें ह्मणतात. कन्यागतीं वर्षभर येथें पुष्कळ यात्रा येत असते. वाई क्षेत्र जरी पुराणकाळापासून प्रसिद्ध आहे, तरी त्याचें आजमितीस दिसणारें सौंदर्य व महत्त्व हीं त्याला अगदीं अलीकडे ह्मणजे पेशवाईंतच प्राप्त झालीं. कृष्णानदीचा पवित्र प्रवाह, उत्तम हवा, भोंवताल्चा धान्य-फल-पुष्पांनीं समृद्ध असणारा प्रदेश व सृष्टिशोभा इत्यादि कारणांनीं ह्या क्षेत्राची भरभराट पेशवाईंत फारच झपाट्यानें झाली. पेशवाईंतील सरदार रास्ते यांनीं हजारों रुपये खर्चून विस्तीर्ण घाट, सुंदर व भव्य मंदिरें, धर्मशाळा, वाडे वगैरे बांधून ह्या क्षेत्राचें महत्त्व व सौंदर्य हीं वाढविलीं. नदीच्या कांठावर बांधलेल्या घाटांची लांबी अर्धा मैल आहे. घाटावर व गांवांत अनेक देवळें आहेत. त्यांत ढोल्या गणपती, विष्णु व लक्ष्मी ह्यांचीं देवळें विशेष प्रेक्षणीय आहेत. चित्रांत धर्मपुरी नांवाच्या घाटाचा देखावा दाखविला आहे. आरंभीं कृष्णानदीचें पात्र, पलीकडे प्रशस्त घाट व त्यावर उंच शिखरें असलेलीं सुंदर देवालयें, त्याही पलीकडे गर्द झाडी व ह्या सर्वांच्या मागें वर डोकें काढलेली व आकाशाला टेकलेली अशी डोंगराची विस्तीर्ण रांग, असा मनोहर देखावा चित्रांत दिसत आहे. वाईंतील बऱ्याच देवळांचें उत्पन्न मोठें असून त्यांचे उत्सव विशेष थाटाचे होतात.



९८ नदी व देवळें—माहुली.

# नदी व देवळें—माहुली.

**माहुली** हें क्षेत्राचें गांव सातारा शहराच्या पूर्वेस सुमारें तीन मैलांवर कृष्णा आणि वेण्या ह्या नद्यांच्या संगमावर आहे. ह्या गांवाचे दोन भाग आहेत. कृष्णेच्या पश्चिम तीरावर असलेल्या भागास संगम—माहुली ह्मणतात. तें औंध येथील पंतप्रतिनिधींच्या ताब्यांत आहे. नदीच्या पूर्वेस ब्रिटिश हद्दींत असलेल्या भागास क्षेत्र—माहुली ह्मणतात.

महाराष्ट्रांत माहुली हें क्षेत्र पवित्र मानिलें जातें. कन्यागतांत येथें फार मोठी यात्रा भरते. येथें कृष्णेच्या तीरावर घाट व देवालयें आहेत. त्यांतील बरींचशीं पंतप्रतिनिधींच्या पूर्वजांनीं १८ व्या शतकांत बांधिलेलीं आहेत. क्षेत्र माहुली गांवांतील कृष्णेच्या तीरावर असलेलें शंकराचें देऊळ चित्रांत दाखविलें आहे. उंच देऊळ, त्यापुढील अनेक पायऱ्या असलेला उतरता घाट व खालीं वाहात असलेली कृष्णानदी असा सुंदर देखावा चित्रांत दिसत आहे. ह्या घाटास ‘ गिरिघाट ’ असें नांव असून तो इ. स १७८० च्या सुमारास बापूभट्ट बिन गोविंदभट्ट या नांवाच्या एका गृहस्थानें बांधिला असें सांगतात. घाटाचें काम फारच मजबूत आहे. नदीच्या पुराच्या पाण्यापासून घाटाचें संरक्षण व्हावें म्हणून बांधिलेले तीन प्रचंड बुरूज चित्रांत दिसत आहेत. घाट चढून गेल्यावर प्रथम कृष्णेचें लहान देऊळ, दीपमाळा व सर्वांत उंच असें शंकराचें देवालय हीं दिसतात. हें देऊळ पंतप्रतिनिधींच्या घराण्यांतील ताईसाहेब नांवाच्या स्त्रीनें इ. स. १८२५ त बांधिलें असें ह्मणतात.

# रामदास स्वामींची समाधि—सज्जनगड.

सातारच्या पश्चिमेस सहा मैलांवर परळी नांवाचा एक फार जुना डोंगरी किल्ला आहे. हा शिवाजीनें इ. स. १६७३ सालीं जिंकून घेतला. नंतर तेथें श्रीसमर्थ **रामदास** स्वामी ह्यांनीं आपलें राहण्याचें मुख्य ठिकाण केलें. स्वामींचें चरित्र महाराष्ट्रांत प्रसिद्धच आहे. ते शके १५३० सालीं जन्मले व शके १५४२ पासून १५५४ पर्यंत बारा वर्षें त्यांनीं टाकळीच्या वनांत तपश्चर्या केली. पुढें बारा वर्षें तीर्थाटन करून ते शके १५६६ सालीं कृष्णातीरीं आले व शिवाजी महाराजांच्या मृत्यूनंतर सहा महिन्यांनीं समाधिस्त झाले.

रामदासस्वामी परळीच्या किल्ल्यावर राहूं लागल्यापासून त्यांच्या दर्शनास अनेक भक्त व सज्जन तेथें वारंवार येऊं लागले. तेव्हांपासून परळीच्या किल्ल्यास 'सज्जनगड' हें नांव पडलें असें ह्मणतात. रामदासस्वामींनीं आपल्या वयाच्या ७३ व्या वर्षीं ह्याच किल्ल्यावर माघ वद्य ९ शके १६०३ रोजीं समाधि घेतली.

सज्जनगडावर रामदास स्वामींनीं रामाचें देऊळ बांधिलेलें चित्रांत दिसत आहे. देवळाचे मुख्य तीन भाग आहेत. पुढील भागीं लाकडी सभामंडप असून मध्यभागीं दगडी दालन आहे. त्याच्यामागें शोभिवंत कळस असलेलें मुख्य देऊळ आहे. शिखराच्या खालीं गाभाऱ्यांत राम, लक्ष्मण व सीता ह्यांच्या पंचरसी धातूच्या मूर्ती आहेत. ह्या गाभाऱ्याच्याच खालीं तळघरांत रामदास स्वामींची समाधि आहे. देवळाच्या जवळच एका खोलींत रामदास स्वामींनीं स्वतः वापरलेल्या कांहीं वस्तु ( पलंग, कुबडी, काठी, हांडा, तांब्या, पंचपात्री वगैरे ) अद्यापि जशाच्या तशाच जतन करून ठेविलेल्या आहेत असें म्हणतात.



९९ रामदासस्वामीची समाधि—सज्जनगड.



१०० शंभुमहादेवाचें देवालय—शिंगणापूर.




# शंभुमहादेवाचें देवालय–शिंगणापूर.

सातारा जिल्ह्यांतील माण तालुक्यांत दहिवडी गांवापासून ईशान्य दिशेस सुमारें तेरा मैलांवर शिंगणापूर नांवाचें यात्रेचें प्रसिद्ध ठिकाण आहे. तेथील **शंभुमहादेवाचें** देवालय चित्रांत दिसत आहे. देवाच्या दर्शनास आलेला जनसमूहही चित्रांत दिसत आहे. देवळाचें शिखर व दीपमाळा फार दूर अंतरावरून आकाशांत उंच गेलेल्या दिसतात. हें शंभुमहादेवाचें देऊळ, देवालयाचें पूर्वेकडील महाद्वार व देवळासभोंवतीं असलेलें दगडी फरसबंदी पटांगण हीं सर्व शिवाजी महाराजांनीं बांधिलीं. देवळाची बांधणी प्रसिद्ध चालुक्य पद्धतीची दिसते. देवळाच्या सभोंवतीं सहा फूट उंचीचा दगडी तट असून, तटाला चारही दिशांस चार दरवाजे आहेत. देवळाच्यासमोर पश्चिमाभिमुख मोठा दगडी नंदी असून तेथेंच दोन मोठ्या घंटा टांगलेल्या आहेत.

देवालयाच्या दक्षिणेस सुमारें १०० यार्डांवर डोंगराच्या अगदीं टोकास तीन इमारती दिसतात. त्यांपैकीं मध्यभागीं असलेली इमारत शिवाजी महाराजांचे वडील शहाजीराजे यांची समाधि होय. या समाधीला लागूनच पूर्व बाजूस असलेली इमारत ही शिवाजी महाराजांचे पुत्र संभाजी महाराज यांची समाधि आहे. ही शाहू महाराजांनीं बांधविली. पश्चिम बाजूस असलेली इमारत कोल्हापूरचे शिवाजी महाराज यांची समाधि आहे.

शिवरात्रीस व चैत्री पौर्णिमेस शंभुमहादेवाच्या डोंगरावर फार मोठी यात्रा भरते. चैत्री पौर्णिमेच्या यात्रेस सुमारें पन्नास हजार लोक जमतात. देवालयाच्या खर्चाकरितां कांहीं गांवें इनाम असून देवळाची व यात्रेची सर्व व्यवस्था सरकारानें नेमलेल्या पंचांमार्फत चालते.

# खंडोबाचें देवालय–जेजुरी.

जेजुरी हें मद्रास व सदर्न मराठा रेल्वेचें स्टेशन असून पुण्याच्या दक्षिणेस ३२ मैलांवर आहे. गांवाशेजारीं २५० फूट उंचीच्या टेकडीवर **खंडोबाचें** देऊळ आहे. त्याचा देखावा चित्रांत दाखविला आहे. उत्तरेच्या बाजूनें टेकडीवर चढण्यास बांधिलेल्या पायऱ्याही चित्रांत दिसत आहेत. रस्त्यावर ठिकठिकाणीं दीपमाळा, कमानी व देवळें बांधिलेलीं आहेत. टेकडीच्या माथ्याभोंवतीं किल्ल्यासारखा उंच दगडी तट आहे. त्याचा घेर ११०० फूट असून तो प्रसिद्ध सरदार मल्हारराव होळकर ह्यांनीं बांधिला. ह्या तटावरून भोंवतालचा फार दूरचा देखावा दृष्टीस पडतो. तटाच्या आंत अनेक देवळें आहेत. त्यांचीं उंच शिखरें चित्रांत दिसत आहेत. त्यांपैकीं एक शिखर खंडोबाच्या देवळाचें आहे. ह्या देवळासमोर बाहेरच्या बाजूस सुमारें २० फूट परिघाचें पितळी पत्र्यानें मढविलेलें कांसव आहे. देवळाच्या गाभाऱ्यांत शिवलिंग आहे व त्याच्या मागें खंडोबा व त्याची पत्नी ह्माळसा ह्यांच्या मूर्ती आहेत.

पूर्वी मणिमल्लादि असुरांचा वध करण्याकरितां शंकर व पार्वती ह्यांनीं मल्हारी व म्हाळसा या नांवांनीं अवतार घेतला अशी कथा प्रसिद्ध आहे. मल्हारी ह्मणजेच खंडोबा होय. खंडोबा हा महाराष्ट्रांतील अनेक हिंदू घराण्यांचें व इन्दूरच्या होळकरांचें कुलदैवत आहे. देवळाच्या गाभाऱ्यांत शके १३०७ मध्यें लिहिलेला शिलालेख आहे, त्यावरून हें देऊळ बरेंच जुनें असावें असें दिसतें. चैत्रांत व पौष महिन्यांत येथें फार मोठी यात्रा भरते. कित्येक लोक खंडोबास मुलगे व मुली अर्पण करण्याचा नवस करितात. ह्या अर्पण केलेल्या स्त्री–पुरुषांस अनुक्रमें मुरळी व वाघ्या असें ह्मणतात. त्यांनीं अविवाहित राहून खंडोबाची सेवा करावयाची असते.



१०१ खंडोबाचें देवालय–जेजुरी.



१०२ नदी व देवळें-चिंचवड.

# नदी व देवळें-चिंचवड.

चिंचवड हें गांव पुण्याच्या वायव्येस दहा मैलांवर पवना नदीच्या उत्तर तीरावर आहे. तें जी. आय्. पी. रेल्वेचें एक स्टेशन आहे. पवनेच्या घाटावर मोरया गोसावी नांवाच्या सिद्ध पुरुषाची समाधि व मोरयाचें (**सिद्धिविनायकाचें**) देवालय आहे. म्हणून हें गांव महाराष्ट्रांत बरेंच प्रसिद्ध आहे. पवनानदी, घाट, देऊळ व समाधि ह्यांचा सुंदर देखावा चित्रांत दिसत आहे. पांढऱ्या रंगाची देवळासारखी जी इमारत चित्रांत दिसते ती मोरया गोसावी ह्यांची समाधि होय. ह्या समाधीच्या आंत एक शिलालेख आहे, त्यावरून ती इ. स. १६५९ सालीं बांधिली असें दिसतें. समाधीच्या पलीकडे **गणपतीचें** उंच देऊळ चित्रांत दिसत आहे.

मोरया गोसावी हे सुमारें २५० वर्षांपूर्वी चिंचवड येथें एक महान् गणपतिभक्त होऊन गेले. हे दर महिन्यांतून एकदां चिंचवडाहून ५० मैलांवर असणाऱ्या मोरगांव येथील गणपतीच्या दर्शनास जात असत. हा त्यांचा क्रम म्हातारपणापर्यंत चालला होता. त्यांची भक्ति व साधुत्व पाहून शेवटीं गणपति त्यांस प्रसन्न झाला व चिंचवड येथें आपल्या भक्तासन्निध येऊन प्रकट झाला. तेव्हांपासून चिंचवडचें महत्त्व वाढूं लागलें. मोरया गोसावी ह्यांच्या सात पिढ्यांतील वंशजांस प्रत्यक्ष गणपतीचे अवतार समजण्यांत येऊन त्यांस 'देव' असें ह्मणत. ह्या सात देवांच्या समाधी नदीकांठीं आहेत. दरसाल मार्गशीर्ष वद्य तृतीया ते षष्ठी पावेतों येथें फार मोठा उत्सव होतो. देवस्थानाची सर्व व्यवस्था पंचांमार्फत चालते.

# नदी व देवळें—आळंदी.

आळंदी हें क्षेत्र पुण्यापासून १३ मैलांवर इंद्रायणी नदीच्या कांठीं आहे. महाराष्ट्रांतील प्रसिद्ध साधु पुरुष व प्राचीन आद्यकवि श्री**ज्ञानेश्वर** महाराज यांची ही जन्मभूमि असून येथेंच त्यांची समाधि आहे. ज्ञानेश्वरांचे वडील हे प्रथम संन्यासी होते. परंतु गुरूच्या आज्ञेवरून त्यांनीं पुन्हां गृहस्थाश्रम स्वीकारिला. नंतर त्यांस निवृत्तिनाथ, ज्ञानदेव, सोपानदेव व मुक्ताबाई अशीं चार अपत्यें झालीं. हीं संन्याशाचीं मुलें ह्मणून त्यांचे धार्मिक संस्कार आळंदी येथील ब्राह्मण करीनात, म्हणून हीं चारही मुलें पैठण येथें गेलीं. तेथें ज्ञानेश्वरांनीं अद्भुत चमत्कार करून दाखविले. तेव्हांपासून त्यांची व त्यांच्या भावंडांची साधुत्वाविषयीं प्रसिद्धि झाली. साधुत्वाप्रमाणेंच ज्ञानेश्वरांची कवित्वाबद्दलही प्रसिद्धि आहे. त्यांनीं मराठी भाषेंत भगवद्गीतेवर भावार्थदीपिका ( ज्ञानेश्वरी ) नामक जी विस्तृत ओंवीबद्ध टीका लिहिली आहे, तिच्या इतका सुंदर काव्यमय ग्रंथ मराठी भाषेंत दुसरा नाहीं असें ह्मणतात. संस्कृतांतील गहन विषय मराठींत सुगम करून लिहिण्याचा पहिला मान ज्ञानेश्वरांसच देणें योग्य आहे. ज्ञानेश्वरांनीं आळंदी येथें शके १२१८ मध्यें समाधि घेतली.

आळंदी येथील इंद्रायणी नदी, नदीवरील घाट, त्यांवरील उंच तट, तटांतील देवळें, ह्यांचा सुंदर देखावा चित्रांत दिसत आहे. ज्ञानेश्वरांचें देऊळ सुमारें ३०० वर्षांपूर्वीं बांधिलें असून त्यांत वेळोवेळीं महाराष्ट्रांतील राजे-रजवाड्यांनीं फेरफार करून सुधारणा केली आहे. देवळाच्या गाभाऱ्यांत ज्ञानेश्वराची समाधि असून तिच्या मागें विठ्ठलरखुमाईच्या मूर्ती आहेत. समाधीच्या संस्थानास मोठें उत्पन्न असून त्याची व्यवस्था पंचांमार्फत होत असते.




१०३ नदी व देवळें—आळंदी.



१०४ नदी व देवळें—देहू.

# नदी व देवळें—देहू.

महाराष्ट्रांतील संतमंडळींत श्रेष्ठता पावलेले **तुकारामबोवा** हे पुणें जिल्ह्यांत इंद्रायणी नदीच्या कांठीं देहू येथें जन्मास आले. तेथें ते आमरण राहिले व शेवटीं तेथेंच ते समाधिस्थ झाले. ह्या कारणांमुळें देहू ह्या गांवाची महाराष्ट्रांतील क्षेत्रांमध्यें गणना होते. दरवर्षी देहूस फाल्गुन वद्य द्वितीयेस तुकाराम बोवांच्या पुण्यतिथीनिमित्त मोठी यात्रा भरते. त्या वेळेचा देखावा फार प्रेक्षणीय असतो.

देहू येथील इंद्रायणी नदी व तिच्या कांठचें विठ्ठलरखुमाईचें मंदीर हीं चित्रांत दिसत आहेत. ह्या मंदिरांतील मूर्ती तुकारामाचे आठवे पूर्वज विश्वंभरबुवा ह्यांनीं स्थापन करून त्यांवर एक लहानसें देऊळ बांधिलें. तुकारामबोवा ह्याच देवळांत भजन व कीर्तन करित असत. पुढें तुकारामाच्या धनिक शिष्यांनीं चित्रांत दिसत असलेलें उंच शिखराचें देवालय, त्याभोंवतालचा मजबूत तट, महाद्वार, त्यावरील नगारखाना व नदीवरील प्रशस्त घाट हीं बांधिलीं. विठोबाच्या देवळाशिवाय आवारांत हरेश्वर, विघ्नराज वगैरेंचीं देवळें आहेत. देवळाच्या समोर प्रवासी लोकांस उतरण्यास धर्मशाळा बांधिली आहे. ह्या देवळाजवळ तुकारामाचें राहतें घर व त्यांतील त्यांच्या जन्माची खोली दाखविण्यांत येते. त्या खोलींत हल्लीं विठ्ठलाची मूर्ति बसविलेली आहे. याशिवाय तुकारामानें जेथून सदेह वैकुंठीं गमन केलें, तें देहू येथील गोपाळपुरा नांवाचें स्थान विशेष प्रसिद्ध असून तेंच यात्रेचें मुख्य ठिकाण असतें. तुकारामाचे वंशज हल्लीं देहूस असून त्यांस देवस्थानाच्या खर्चाकरितां तीन गांवें इनाम आहेत.

# सोपानदेवाची समाधि—सासवड.

पुण्याच्या आग्नेयि दिशेस सुमारें २० मैलांवर सासवड नांवाचें इतिहास व पुराणप्रसिद्ध शहर कऱ्हा नदीच्या उत्तर तीरावर आहे. येथें महाराष्ट्रांतील संतांपैकीं **सोपानदेव** ह्यांची समाधि कऱ्हा व चांबळी ह्या नद्यांच्या संगमापासून थोड्याशा अंतरावर आहे. वरील दोन नद्यांचें संगमस्थान, तेथील घाट व संगमेश्वराचें देऊळ ह्यांचा सुंदर देखावा चित्रांत दिसत आहे. चित्रांत उजव्या बाजूस दूर अंतरावर एक पांढरी इमारत दिसते तीच सोपानदेवाची समाधि होय. समाधीचा मंडप विस्तीर्ण असून तेथील मधल्या दालनांतील खांबावरील शिल्पकाम फार प्रेक्षणीय आहे. सोपानदेव हे ज्ञानेश्वरांचे कनिष्ठ बंधु असून निवृत्तिनाथ हे त्यांचे मोक्षगुरू होत. निवृत्तिनाथ, ज्ञानदेव, सोपानदेव व मुक्ताबाई हीं चार भावंडें महाराष्ट्रांत भगवद्भक्त ह्मणून प्रसिद्ध आहेत. ज्ञानेश्वरांनीं समाधि घेतल्यानंतर श्रीपांडुरंगाच्या आज्ञेनें सोपानदेवांनीं शके १२१९ मार्गशीर्ष शुद्ध त्रयोदशीच्या दिवशीं समाधि घेतली. त्या वेळीं त्यांचे गुरु निवृत्तिनाथ व शिष्य विसोबा खेचर, नामदेव व सेना न्हावी हे हजर होते. समाधिकालानंतर अनेक वर्षांनीं समाधीची जागा सिद्धानंद गोसावी यानें उजेडांत आणून तेथें नैवेद्य व नंदादीपाची व्यवस्था श्रीशिवाजीमहाराजांकडून करविली.



१०५ सोपानदेवाची समाधि—सासवड.




१०६ भीमाशंकराचें देवालय—जिल्हा पुणें.

# भीमाशंकराचें देवालय–जिल्हा पुणें.

हिंदुस्तानांत जीं प्रसिद्ध बारा ज्योतिर्लिंगें आहेत त्यांपैकीं **भीमाशंकर** हें एक असून तें पुणें जिल्ह्यांत खेड तालुक्याचे पश्चिमेस सह्यपर्वतावर आहे. त्यासंबंधीं पौराणिक कथा अशी आहे कीं, पूर्वीं त्रिपुरासुर नांवाचा एक दैत्य ब्रह्मदेवाच्या वरानें मदोन्मत्त झाला होता. त्यानें इंद्राशींही युद्ध करून त्यांत त्याचा पराभव केला. तेव्हां इंद्रादि सर्व देव चिंताक्रांत झाले. शेवटीं त्यांनीं शंकराची आराधना केली. त्या वेळीं संतुष्ट होऊन शंकर म्हणाले, "तुह्मी सह्यपर्वतावर जा. तेथें तप करा ह्मणजे मी तुमचे मनोरथ लवकरच पूर्ण करीन." शंकराच्या आज्ञेप्रमाणें इंद्रादिदेवांनीं तप केलें. तेव्हां श्रीशंकर प्रसन्न होऊन त्यांनीं सात दिवस त्रिपुरासुराशीं मोठें युद्ध करून त्यांत त्यास ठार मारिलें व ज्योतिर्लिंगाच्या रूपानें सह्यपर्वतावरच राहिले.

चित्रांत भीमाशंकराचें प्रसिद्ध हेमाडपंती देऊळ दाखविलें आहे. हें पूर्वीं नानावटी ह्या नांवाचे कोणी गृहस्थ होऊन गेले त्यांनीं प्रथम बांधिलें असें सांगतात. पुढें नाना फडणविसांनीं त्याची दुरुस्ती करून हल्लींचें काळ्या पाषाणाचें बांधकाम केलें असें ह्मणतात. भीमाशंकराच्या देवळापासून वायव्येस सुमारें एक फर्लांगावर एक लहानसें पाण्याचें कुंड आहे. तेथून भीमानदीचा उगम झाला आहे असें सांगतात. भीमाशंकराची पूजा गुरवाकडे आहे. त्यास पूजा, नैवेद्य, नंदादीप वगैरेकरितां सरकारांतून सुमारें ३५० रुपये सालीना मिळतात. शिवाय शिवाजी महाराजांच्या वेळेपासून खरोसी गांव पूजानैवेद्याकरितां देवास इनाम आहे. शिंदे सरकारांतूनही अन्नसत्राकरितां कोडिलकर उपनांवाच्या ब्राह्मणाकडे ६०० रुपये येत असतात.

# सिद्धेश्वराचें देवालय–सोलापूर.

सोलापूर शहराच्या दक्षिणेस सिद्धेश्वर नांवाचा तलाव आहे. या तलावाच्या वायव्य कोंपऱ्यावर **सिद्धेश्वराचें** प्रसिद्ध देवालय आहे. देवालय लहान असून त्याच्या सभोंवार दगडी फरशी आहे. देवळाच्या मध्यभागीं दगडी चौथऱ्यावर शंकराच्या दोन पिंडी असून देवळाच्या मागें लहान धर्मशाळा आहे. सिद्धेश्वराचें मुख्य देवालय, त्यावरील शिखर व पुढील सभामंडपाचें पत्र्याचें छप्पर हीं चित्रांत दिसत आहेत. हें देवालय सिद्धेश्वर नांवाच्या एका मोठ्या लिंगायत साधूनें १२ व्या शतकाच्या उत्तरार्धांत बांधिलें असें ह्मणतात. चित्राच्या पुढील भागीं सिद्धेश्वराचा प्रसिद्ध तलाव व त्यांत वाढलेलीं असंख्य कमलदलें दिसत आहेत. देवळाच्या व्यवस्थेचा वगैरे खर्च 'सिद्धेश्वर धर्म निधींतून' चालतो. त्यावर एक व्यवस्थापक मंडळी असून या निधीस श्रीमंत व्यापारी देणग्या देतात. तसेंच व्यापारी मालावर लहानसा कर बसवून तो त्या निधीसाठीं वसूल केला जातो. प्रसिद्ध गड्डा नांवाची यात्रा येथें दरवर्षी पौषांत भरते. मकरसंक्रांतीचा दिवस हा यात्रेचा मुख्य दिवस होय. त्या वेळीं सोलापूर शहरांतील पुष्कळ दुकानें सिद्धेश्वर तलावाच्या कांठावरील मोकळ्या उंचवठ्यावर नेतात. काठ्यांची मिरवणूक व दारुकाम सोडणें ह्या दोन गोष्टी यात्रेच्या उत्सवांत मुख्य असतात.



१०७ सिद्धेश्वराचें देवालय-सोलापूर.



१०८ शहा जहूरची कबर—सोलापूर.

# हजरत शाह जहूर यांचा दर्गा–सोलापूर.

हजरत शाह जहूरचा घुमट या नांवाचें एक मुसलमान अवलियाचें पवित्र स्थान सोलापुरास सिद्धेश्वर नांवाच्या तलावाच्या दक्षिणतीरीं आहे. ह्या घुमटांत **हजरत शाह जहूर** या मुसलमान साधूची कबर आहे. मोहंमद तुघलकानें दौलताबाद ही राजधानी करण्याकरितां दिल्लीहून जे लोक दक्षिणेंत आणिले, त्यांत शाह जहूर यांचे पूर्वज होते. ह्या घराण्यांतील लोक हजरत हसन यांचे वंशज असून संन्यस्त वृत्तीनें राहात व मुसलमानी धर्माचा प्रसार करीत. त्याप्रमाणें शाह जहूर ह्यांनींही दक्षिणेंत धर्मप्रसाराचें काम सुरू केलें व ते सोलापूर येथें कायमचे राहिले. हे जरी धर्मप्रसाराचें काम करीत असत तरी त्यांनीं हिंदूंवर कधीं जुल्म केला नाहीं किंवा त्यांच्या धर्माची निंदा केली नाहीं. त्यांनीं अनेक चमत्कार केल्याचें सांगतात. ह्यामुळें हिंदू लोकही त्यांनां फार मानीत असत. ते वारल्यावर त्यांची कबर त्यांच्या हिंदुमुसलमान शिष्यांनीं हिंदूंच्या पवित्र देवळाजवळच बांधिली. ह्यानंतर १५० वर्षांनीं हल्लीं असलेली घुमटाची इमारत बेदरच्या मुसलमान बादशहाकडून बांधिली गेल्याचें सांगतात. हजरत शाह जहूर हे अविवाहित होते. हल्लीं त्यांच्या बहिणीचा वंश सोलापुरास आहे व त्यापैकीं एक पुरुष ह. शाह जहूर ह्यांच्या गादीवर आहे. मुसलमानी बादशहांचे अमदानींत ह्या गादीला बरीच जमीन इनाम होती. हल्लीं सरकारांतून कांहीं नक्त नेमणूक आहे. दरवर्षीं मुसलमानी सफर महिन्याच्या १०, ११ व १२ ह्या तारखांस येथें मोठा उत्सव होतो. शेवटच्या दिवशीं मोठें प्रयोजन होतें. घुमटाची इमारत फारशी मोठी किंवा प्रेक्षणीय नाहीं. ती खालच्या भागास चौकोनी असून घुमटासुद्धां तिची एकूण उंची ३० फूट आहे.

# चंद्रभागेचा देखावा—पंढरपूर.

पंढरपूर हें क्षेत्र सोलापूर जिल्ह्यांत भीमानदीच्या कांठीं आहे. नदीचा प्रवाह पंढरपुराजवळ चंद्रकोरीसारखा वक्र होऊन वहात असल्यामुळें तिला येथें **'चंद्रभागा'** असें ह्मणतात. चंद्रभागेचा देखावा चित्रांत दाखविला आहे. पूर्वीं आगगाडीचें स्टेशन नदीच्या पलीकडे होतें. त्या वेळीं यात्रेकरू प्रथम तेथें उतरत व नावांतून अलीकडे पंढरपुरास येत. परंतु चंद्रभागेवर पूल बांधून आगगाडीचें स्टेशन आतां नदीच्या अलीकडे पंढरपुरांत आणिलें आहे. यात्रेच्या दिवसांत यात्रेकरूंच्या सोयीकरितां अनेक गाड्या सुटत असतात. चंद्रभागेला विठ्ठलाच्या चरणाचीं गंगा समजून अत्यंत पवित्र मानितात. नदीच्या कांठावर ठिकठिकाणीं मोठमोठे घाट बांधिलेले आहेत. नदीच्या प्रवाहांत अनेक साधु पुरुषांच्या समाधी व कित्येक मंदिरें बांधिलेलीं चित्रांत दिसत आहेत. चित्रांत अगदीं डाव्या बाजूस असलेलें पुंडलिकाचें देऊळ विशेष प्रसिद्ध आहे. ह्याच पुंडलिकाचे भक्तीस्तव पंढरपूर क्षेत्रांत विठ्ठलाचा अवतार झाला. पंढरपुरापासून जवळच विष्णुपद नांवाचें तीर्थ आहे. तेथें कित्येक यात्रेकरू श्राद्धविधि करितात. यात्रेच्या दिवसांतील चंद्रभागेच्या वाळवंटावरील शोभा व सोहळा पाहण्यासारखा असतो. जिकडेतिकडे टाळ, मृदंग, विणे ह्यांच्या सुस्वर नादांत हजारों भक्त विठ्ठलनामाचा घोष करीत भजनाच्या रंगांत तल्लीन होऊन नाचत असलेले दृष्टीस पडतात. भक्तिप्रेमाचा उमाळा येऊन "पुंडलीक वरदे हरिविठ्ठल" हा जयजयकार ध्वनि त्यांच्या मुखांतून एकसारखा निघत असतो. चंद्रभागेंत स्नान केल्यानंतर मग यात्रेकरू देवदर्शनास जातात.




१०९ चंद्रभागेचा देखावा—पंढरपूर.



११० नामदेवाची पायरी—पंढरपूर.

# नामदेवाची पायरी—पंढरपूर.

**नामदेव** हा मोंगलाईतील परभणी जिल्ह्यांतील नरसी ब्राह्मणी या गांवच्या दामाशेटी शिंप्याचा मुलगा. त्याचा जन्म शके ११९२ मध्यें झाला. नामदेवाला लहानपणीं वाईट संगत लागून तो चोर बनला. रोज तो नेमानें आपल्या गांवाजवळील औंढ्या नागनाथाच्या दर्शनास मात्र जाई. एकदां तो तेथें गेला असतां आरतीच्यावेळीं देव-दर्शनास आलेल्या एका बाईच्या मुलानें देवापुढील नैवेद्याच्या अन्नाचा हट्ट धरिला. त्या बाईनें मुलाला पुष्कळ समजाविलें तरी जेव्हां तो हट्ट सोडीना तेव्हां तिनें त्याला पुष्कळ मारिलें. तें पाहून नामदेवाचें मन कळवळलें व त्यानें तिला त्या मुलाला कां मारतेस ह्मणून विचारिलें. तेव्हां तिनें सांगितलें कीं "माझा पति राउत (घोडेस्वार) याला नामदेव चोरानें ठार मारिलें. आतां मी या मुलाचे लाड कसे पुरवूं ?" तिचे हे दीनवाणे शब्द ऐकतांच नाम-देवाला पश्चात्ताप होऊन देवळाच्या गाभाऱ्यांत शिरून शस्त्रानें तो आपलें शिर तोडणार तोंच त्याला सर्वांनीं आवरिलें. तरी त्याला एक वार लागलाच. तसाच तो पुढें पंढरपुरास गेला व विठ्ठलभजनांत दंग झाला. नामदेवाच्या घरांतील इतर मंडळीही पुढें तेथेंच जाऊन राहिली. पुढें औंढ्या गांवांतील प्रख्यात साधु पुरुष विसोबा खेचर यास नामदेवानें आपला गुरु केलें. विसोबापासूनच त्याला कवित्व करण्याची स्फूर्ति मिळाली. त्यानें पुढें पुष्कळ अभंग केले. शके १२७२ आषाढ शुद्ध त्रयोदशीस पंढरपुरास देवद्वारीं श्रीविठ्ठलाचे पायापाशीं नामदेवानें समाधि घेतली. हें समाधीचें ठिकाण पंढरपुरास विठ्ठलाच्या देवळाच्या महाद्वारापाशीं असलेलें चित्रांत दाखविलें आहे. यास नामदेवाची पायरी म्हणतात. ही पायरी पत्र्यानें मढविली असून तीवर नामदेवाचा पितळेचा पुतळा करून बसविला आहे.

# विठोबाचें देऊळ–पंढरपूर.

महाराष्ट्रांतील मुख्य क्षेत्र पंढरपूर हें सोलापूर जिल्ह्यांत भीमानदीच्या कांठीं बार्शी लाईट् आगगाडीचें स्टेशन आहे. येथील मुख्य दैवत **विठ्ठल** अथवा पांडुरंग हें होय. हें क्षेत्र बरेंच प्राचीन आहे. महाराष्ट्रांत १३ व्या शतकापासून १७ व्या शतकापर्यंत जे संत व कवि निर्माण झाले, त्यांपैकीं बहुतेकांचें उपास्य दैवत विठ्ठलच होतें. त्यांनीं आपल्या ग्रंथांतील उपदेशानें महाराष्ट्रांतील सामान्य जनांना धर्मजीवन पाजून त्यांमध्यें ऐक्य उत्पन्न केलें व त्यामुळेंच दोनअडीचशें वर्षांच्या मुसलमानी अंमलानंतरही महाराष्ट्राचें सत्त्व कायम राहून पुढें योग्यकाळीं शिवाजीस तेथें स्वराज्याचा वृक्ष लावितां आला. महाराष्ट्रांत विठ्ठलाची भक्ति करणारे लोक इतर कोणत्याही देवतेच्या भक्तांपेक्षां संख्येनें अधिक आहेत. ह्या विठ्ठलभक्तांस सामान्यपणें वारकरी असें ह्मणतात. वर्षांतून दोन वेळां आषाढी व कार्तिकी एकादशीस पंढरपूर येथें लाख दोन लाख यात्रा भरते. इतकी मोठी यात्रा महाराष्ट्रांत दुसरी कोठेंही भरत नाहीं. ह्या यात्रेंतील मुख्य विधि ह्मणजे चंद्रभागेंत स्नान करणें व विठ्ठलाचें दर्शन घेणें हा होय.

विठ्ठलाचें देऊळ गांवाच्या मध्यभागीं असून तें फार भव्य आहे. देवळाचा पश्चिम बाजूचा देखावा चित्रांत दिसत आहे. नामदेव दरवाजांतून व मुक्तिमडपांतून आंत गेल्यावर पुढें सोळखांबी व चौखांबी अशीं दोन दालनें लागतात. त्यांतून आंत गेलें असतां सुमारें आठ चौरस फुटांच्या लहानशा गाभाऱ्यांत विठ्ठलाची काळ्या पाषाणाची साडेतीन फूट उंचीची, विटेवर उभी असलेली व कटीवर कर ठेवलेली सुंदर मूर्ति दिसते. नामदेव, तुकाराम आदिकरून संतांनीं जिचें ध्यान केलें, त्या मूर्तीचें दर्शन घेऊन भक्तजनांस धन्यता वाटते.



१११ विठोबाचें देऊळ—पंढरपूर.




११२ चांगदेवाची समाधि—पुणतांबे.

# चांगदेवाची समाधि–पुणतांबें.

अहमदनगर जिल्ह्यांत जी. आय्. पी. रेल्वेच्या दौंड–मनमाड फाट्यावर गोदावरी नदीच्या कांठीं पुणतांबें नांवाचें क्षेत्र आहे. तेथें **चांगदेव** नांवाचा एक महान् भगवद्भक्त व प्रसिद्ध योगी पुरुष होऊन गेला. हा जातीचा यजुर्वेदी ब्राह्मण. चांगदेवाचा व्रतबंध झाल्यावर त्यानें वेद आणि योगादि निरनिराळीं शास्त्रें ह्यांचा अभ्यास केला. आपल्या योगसामर्थ्यानें त्यानें लोकांस अद्भुत चमत्कार करून दाखविल्याच्या अनेक कथा प्रसिद्ध आहेत. एके वेळीं स्वतःच्या योगसामर्थ्याचा त्यास गर्व होऊन तो वाघावर बसून ज्ञानेश्वर महाराजांस भेटावयास गेला. तेव्हां ज्ञानेश्वरांनीं एका घराची भिंत चालवून दाखवून त्याचा गर्व नाहींसा केला. ज्ञानेश्वराची बहीण मुक्ताबाई हिनें चांगदेवास गुरूपदेश केला. त्यामुळें त्यास पुढें खरें ज्ञान प्राप्त होऊन त्यानें पुणतांबें क्षेत्रीं शके १२१५ सालीं कार्तिक शुद्ध एकादशीस समाधि घेतली.

समाधीचा देखावा चित्रांत दिसत आहे. हें समाधिस्थान पुणतांबें गांवाच्या पूर्वेस थोड्या अंतरावर गोदावरीच्या कांठीं आहे. समाधि काळ्या दगडांनीं बांधिलेली असून तिच्या मध्यभागीं पादुका आहेत. कांहीं वर्षांपूर्वीं देशपांडे नांवाच्या एका गृहस्थांनीं आपल्या वडिलांच्या स्मरणार्थ चित्रांत दिसत असलेली छत्री समाधीवर बांधिली. छत्रीचें काम शुद्ध संगमरवरी पांढऱ्या पाषाणाचें असून फारच सुबक आहे. प्रतिवर्षीं कार्तिक शुद्ध एकादशीस येथें मोठी यात्रा भरते.

# प्रवरासंगम–जिल्हा अहमदनगर.

अहमदनगर जिल्ह्यांतील नेवासें गांवाच्या ईशान्येस सात मैलांवर गोदावरी व प्रवरा या दोन नद्यांचा संगम झाला आहे. चित्रांत डाव्या बाजूस दिसणारी प्रवरा व उजव्या बाजूनें येणारी गोदावरी नदी होय. या दोन नद्यांच्या संगमावर वसलेलें टोंकें नांवाचें क्षेत्राचें गांव, संगमावरील घाट, बुरूज व वाडे चित्रांत दिसत आहेत. हें संगमाचें ठिकाण असल्यामुळें फार पवित्र मानितात. सिंहस्थांत येथें फार मोठी यात्रा भरते.

पेशवाईच्या काळीं हा गांव मोठा भरभराटीचा असून त्याच वेळीं तेथील घाट व वाडे बांधिले गेले. नाना फडणविसांचा घाट व वाडा गांवाच्या पश्चिमेस आहे. टोंकें गावांत सिद्धेश्वराचें स्वयंभू स्थान आहे. सिद्धेश्वराचें देऊळ गद्रे नांवाच्या श्रीमंत सरदारांनीं ९३००० रुपये खर्चून बांधिलें असें ह्मणतात. या देवळाच्या सभोंवार भिंतींवर त्या काळच्या शिल्पकारांच्या कौशल्याचे अप्रतिम नमुने आहेत. देवळाच्या पुढच्या बाजूस असलेलीं दशावतारांचीं चित्रें, डाव्या बाजूस असलेले मत्स्यभेद व रुक्मिणीस्वयंवर व उजव्या बाजूचीं कृष्ण व गोपी यांचीं निरनिराळ्या प्रसंगांचीं चित्रें फारच सुंदर व प्रशंसनीय आहेत.

प्रवरानदीचें पाणी फार गोड व पाचक ह्मणून प्रसिद्ध आहे. गंगास्नान व प्रवरापान या दोन्ही गोष्टी येथें उपलब्ध असल्यामुळें हें स्थान फार प्रसिद्ध झालें आहे. पावसाळ्यांत दोन्ही नद्यांना पूर आल्यावर या संगमाचा देखावा फारच बहारीचा दिसतो. त्या वेळीं कधींकधीं गोदावरीचें पात्र प्रवरेच्या पात्रापेक्षां थोडेंसें वर उचललेलें दिसतें.




११३ प्रवरासंगम–जिल्हा अहमदनगर.



११४ नदी व देवळें—नाशिक.

# नदी व देवळें—नासिक.

नासिक हें क्षेत्र गोदावरी नदीच्या कांठीं असून त्याचे मुख्य दोन भाग आहेत. नदीच्या पश्चिमेकडील भागास नासिक व पूर्वेकडील भागास 'पंचवटी' असें म्हणतात. हीं दोन्हीं स्थानें पुराणप्रसिद्ध आहेत. रामानें लक्ष्मण व सीता ह्यांसह वनवासांतील बरेचसे दिवस पंचवटी व नासिक येथें घालविले. रावणानें सीतेस चोरून नेलेलें स्थान व रामलक्ष्मणांच्या अनेक अद्भुत कृत्यांचीं स्थळें पंचवटींत अजूनही दाखविलीं जातात. रामानें दशरथाचें श्राद्ध गोदावरी नदींत ज्या ठिकाणीं केलें तें रामकुंड विशेष पवित्र मानिलें जातें. नासिक क्षेत्राची गणना हिंदुस्तानांतील विशेष प्रख्यात क्षेत्रांमध्यें होते. बाराही महिने हिंदुस्तानांतील दूरदूरच्या ठिकाणांहून येथें यात्रेकरू येत असतात. सिंहस्थामध्यें ह्या क्षेत्राचें महत्त्व विशेष असल्यामुळें येथें त्या वेळीं वर्षभर लाखों यात्रा येते. हें क्षेत्र जरी अत्यंत प्राचीन आहे, तरी पेशवाईंतच ह्या क्षेत्रीं विस्तीर्ण घाट, कुंडें, देवळें, मठ, धर्मशाळा वगैरे बांधण्यांत येऊन त्याचें ऐश्वर्य वाढलें. येथें काळाराम, गोराराम, सुंदरनारायण, नारोशंकर वगैरे मंदिरें विशेष प्रसिद्ध आहेत. येथील प्रातःकाळचा गोदावरीच्या कांठचा सुंदर देखावा चित्रांत दाखविला आहे. नदीचें पात्र व घाट, पलीकडील पंचवटीचा भाग, रामेश्वराचें देऊळ, त्या भोंवतालचा तट व बुरूज असा देखावा चित्रांत दिसत आहे.

# काळ्या रामाचें देवालय—नासिक.

नासिक येथील काळ्या रामाचें देवालय हें पश्चिम हिंदुस्तानांतील उत्कृष्ट देवालयांपैकीं एक आहे. तें २४५ फूट लांब व १०५ फूट रुंद असून त्याच्या सभोंवतीं १७ फूट उंचीचा दगडी तट आहे. तटाच्या चारी भिंतींच्या मध्य-भागीं दरवाजे आहेत. पूर्वेकडील महाद्वारावर नगारखाना असून त्यावरून नासिक शहराचा सुंदर देखावा दिसतो. तटाच्या आंत पूर्वबाजूला सभामंडप आहे. पुढें पश्चिमेस एका उंच चौथऱ्यावर मुख्य देवालय आहे. देवळाचें काम साधें, सुंदर व प्रेक्षणीय आहे. राम वनवासांत असतांना ज्या ठिकाणीं राहिले त्याच स्थानावर हें देवालय सरदार रंगराव ओढेकर यांनीं १७८२ सालीं बांधिलें असें म्हणतात. बांधकाम १२ वर्षें चाललें असून रोज २००० मजूर कामावर होते व एकंदर खर्च २३ लाख रुपये लागला असें देवळांतील शिलालेखावरून समजतें. देवळाचे पश्चि-मेस गाभाऱ्यांत एका सुंदर उच्चासनावर राम, लक्ष्मण आणि सीता यांच्या काळ्या पाषाणाच्या दोन फूट उंचीच्या फार सुबक मूर्ती आहेत. देवळाला सरकारांतून १२२२ रुपये वर्षासन मिळतें व नगारखान्याच्या खर्चासाठीं ८०० रुपये वार्षिक उत्पन्नाचें शिंगवें गांव देवास इनाम आहे. ओढेकर घराण्याकडून दरमहा ८० रुपये मिळतात व रोजच्या देवापुढील देणग्यांमुळें जवळ जवळ वार्षिक १००० रुपये जमतात. चैत्रांत रामनवमीला येथें मोठी यात्रा भरते व एकादशीच्या दिवशीं रथाची मिरवणूक निघते.



११५ काळ्या रामाचें देवालय—नाशिक.



११६ त्र्यंबकेश्वराचें देऊळ—त्र्यंबक.

# त्र्यंबकेश्वराचें देऊळ—त्र्यंबक.

त्र्यंबक हें क्षेत्राचें गांव नासिकच्या वायव्येस वीस मैलांवर गोदावरी नदीच्या उगमाजवळ आहे. नासिक-प्रमाणेंच पेशवाईंत ह्या क्षेत्रांत अनेक देवालयें, कुंडें, तलाव, हीं बांधण्यांत आलीं. त्यांत **त्र्यंबकेश्वराचें** देऊळ हें प्रमुख असून त्याचा देखावा चित्रांत दाखविला आहे. हें देऊळ बांधण्याचें काम नानासाहेब पेशव्यांनीं सुरू केलें व तें त्यांच्या मृत्यूनंतर सन १७८६ मध्यें पूर्ण झालें. ह्या कामास एकूण नऊ लक्ष रुपये खर्च लागला असें सांगतात. देवळाचें काम सर्व दगडी असून तें फार मजबूत व सुंदर आहे. देवळाच्या गाभाऱ्यांत संगमरवरी दगडाची फरशी असून मध्यभागीं स्वयंभू शिवाचें स्थान आहे. हें बारा ज्योतिर्लिंगांपैकीं एक आहे. देवळाच्या सभोंवतीं फरसबंदी पटांगण व मजबूत कोट आहे. देवळावर सोन्याचा मुलामा केलेला कळस आहे.

ह्या देवस्थानास वार्षिक १२००० रुपयांची सरकारी नेमणूक आहे. देवस्थानाचा कारभार जोगळेकर घराण्याकडे वंशपरंपरा चालत आला असून एकंदर ६० माणसें देवस्थानाच्या नोकरीस आहेत. या देवाचे अलंकार व इतर सरंजाम पाहाण्यासारखा आहे. त्यांपैकीं सदाशिवराव भाऊ पेशव्यांनीं अर्पण केलेला रत्नजडित बहुमूल्य मुकुट विशेष दर्शनीय आहे. तसेंच देवाचा सुंदर रथ, सोन्याचे व चांदीचे मुखवटे व इतर वस्त्राभरणें हीं प्रेक्षणीय आहेत. प्रत्येक सोमवारीं त्र्यंबकेश्वराचा सुवर्णाचा मुखवटा, रत्नजडित मुकुट व वस्त्रालंकार घालून, पालखींतून मिरवीत कुशावर्त तीर्थावर नेतात, त्या वेळीं ही मिरवणूक पाहाण्यासारखी असते. दरसाल महाशिवरात्रीस व कार्तिकी पौर्णिमेस येथें फार मोठी यात्रा भरते.

# गंगाद्वार-त्र्यंबक.

गोदावरीच्या उगमानजीक त्र्यंबकक्षेत्रीं जीं पवित्र स्थळें आहेत, त्यांत गंगाद्वाराचें बरेंच महत्त्व आहे. हें स्थान त्र्यंबक गांवापासून थोड्या अंतरावर ब्रह्मगिरी नांवाच्या उंच डोंगरावर आहे. गंगाद्वारीं जाण्याकरितां डोंगराची बरीच चढण चढावी लागते. ह्या चढणीवर मुंबईचे एक व्यापारी हंसराज करमसी ह्यांनीं चाळीस हजार रुपये खर्चून ७५० पायऱ्या बांधिल्या आहेत. त्यामुळें यात्रेकरूंस वर जाण्यास सुलभ झालें आहे. सुमारें अर्ध्या पायऱ्या चढून गेल्यावर रामाचें मंदीर व रामतीर्थ लागतें. यात्रेकरू तेथें थोडी विश्रांति घेऊन पुढें चढूं लागतो. सर्व पायऱ्या चढून गेल्यावर गंगाद्वार लागतें. त्याचा देखावा चित्रांत दिसत आहे. एका बाजूस तुटलेला उंच कडा दिसत असून त्याच्या खालीं एका दगडी चौथऱ्यावर एक लहानसें देऊळ आहे. त्यांत गंगेची ( गोदावरीची ) पितळी मूर्ति आहे. देवीचा पूजारी जवळ बसला असून खालच्या बाजूस एक जटाधारी गोसावी बसला आहे असा देखावा चित्रांत दिसत आहे. ह्या देवळानजीकच खडकांत असलेल्या गायमुखांतून थोडें थोडें पाणी पडत असतें. हाच गंगेचा ( गोदावरीचा ) उगम होय. ह्मणून या ठिकाणास **गंगाद्वार** असें ह्मणतात. गंगाद्वाराचें पाण्याचें कुंड फार लहान असल्यामुळें यात्रेकरू तेथें स्नान न करितां जवळच वराहतीर्थ आहे, तेथें स्नान करितात. गंगाद्वारीं उगम पावलेली गंगा तेथेंच गुप्त होऊन त्र्यंबक क्षेत्रांत कुशावर्त नांवाच्या तीर्थांत पुन्हा प्रगट झाली अशी कथा आहे. गंगाद्वारावर उभें राहून खालीं पाहिलें असतां त्र्यंबकगांव, गंगालय, कुशावर्त, त्र्यंबकेश्वराचें देऊळ, निवृत्तिनाथाची समाधि यांचा सुंदर देखावा दिसतो.



११७ गंगाद्वार—त्र्यंबक.



११८ निवृत्तिनाथाची समाधि—त्र्यंबक.

# निवृत्तिनाथाची समाधि–त्र्यंबक.

त्र्यंबक गांवाजवळ गंगालय अथवा गंगासागर नांवाचा तलाव असून त्याचे पश्चिम तीरावर **निवृत्तिनाथ** ह्या सत्पुरुषाची समाधि आहे. निवृत्तिनाथ हे ज्ञानेश्वरांचे वडील बंधु होत. आळंदीहून आपल्या भावंडांसह ते पैठणास जात असतां त्र्यंबकक्षेत्रीं ब्रह्मगिरीवर राहाणाऱ्या गैबीनाथ ह्या साधूनें त्यांच्यावर अनुग्रह करून त्यांस योगमार्गाची दीक्षा दिली, तेव्हांपासून ते परमज्ञानी झाले अशी कथा प्रसिद्ध आहे. पुढें ज्ञानदेव, सोपानदेव व मुक्ताबाई ह्या भावंडांनीं निवृत्तिनाथासच आपला गुरु केलें. ज्ञानेश्वरांनीं आपल्या भावार्थदीपिका ( ज्ञानेश्वरी ) ग्रंथांत गुरु ह्मणून निवृत्तिनाथांस अनेकवेळां वंदन केलें आहे. ज्ञानेश्वर, सोपानदेव व मुक्ताबाई ह्यांनीं समाधि घेतल्यावर निवृत्तिनाथांनीं त्र्यंबकक्षेत्रीं शके १२१९ मध्यें समाधि घेतली. त्यांच्या समाधीवर बांधिलेलें मंदिर, पुढील सभामंडप व धर्मशाळा हीं अगदीं अलीकडच्चीं ह्मणजे गेल्या १०० वर्षांतलीं आहेत. त्यांच्या पुण्यतिथीचा उत्सव दरसाल पौष वद्य एकादशीस होतो.

गंगासागर तलाव, पांढरें शिखर असलेली निवृत्तिनाथांची समाधि व त्याच्या पलीकडे वृक्षाच्छादित उंच ब्रह्मगिरि, ह्यांचा सुंदर देखावा चित्रांत दाखविला आहे. तलावाच्या पाण्यांत समाधीच्या शुभ्र शिखराचें प्रतिबिंब पडलेलें आहे. देवळाजवळ बरेच भक्तजन समाधीच्या दर्शनास जमलेले दिसत आहेत. गंगासागर हा तलाव मालेगांवचे सरदार नारोशंकर राजेबहादर ह्यांनीं सन १७७७ चे सुमारास बांधिला व त्यास पाऊणलाख रुपये खर्च आला असें ह्मणतात.

# सप्तशृंग–जिल्हा नासिक.

नासिक जिल्ह्यांत वणी गांवाजवळ सप्तशृंग नांवाचें ४६५९ फूट उंचीचें सह्यपर्वताचें एक शिखर आहे. त्यावरील एका कड्यांत देवीचें प्राचीन स्थान आहे. ह्या देवीचें महात्म्य सप्तशती नांवाचे ग्रन्थांत वर्णिलें आहे. ही देवी महाराष्ट्रांतील अनेक घराण्यांचें कुलदैवत आहे. दरसाल चैत्री पौर्णिमा व आश्विनी पौर्णिमा ह्या दिवशीं येथें मोठी यात्रा भरते.

सप्तशृंग डोंगराच्या पायथ्यापर्यंत यात्रेकरू बैलगाडीनें जातात. पुढें सर्व प्रवास पायींच करावा लागतो. डोंगराची चढण फार बिकट आहे. वणी गांवापासून सुमारें दीड कोस चढून गेल्यावर खडकांत कोरलेल्या ३५० पायऱ्या लागतात. पुढें बरीच मोठी डोंगरसपाटी लागते. ह्या सपाटीवर गणपतीचें देऊळ, तीर्थोदकाचीं कुंडें, पूजारी व गवळी ह्यांचीं घरें, धर्मशाळा व तलाव हीं दृष्टीस पडतात. ह्या सपाटीच्यापुढें ७५० पायऱ्या चढून गेल्यावर एका उंच व सरळ कड्याच्या पायथ्याशीं लहानशा गुहेंत देवीची आठ फूट उंचीची, अठरा भुजांची, सिंदूरचर्चित भव्य मूर्ति दृष्टीस पडते.

चित्रांत सप्तशृंग डोंगर दिसत आहे. त्यांतील उंच कड्याच्या खालीं मध्यभागीं एक तिरपी भिंत दिसते, तिच्या पलीकडे खडकांत देवीचें स्थान आहे. डोंगराचें सर्वांत उंच शिखर ह्या स्थानाच्या वर असून त्याच्या सर्व बाजूंस तुटलेले दुर्गम कडे आहेत. यात्रेच्या दिवसांत एक विशिष्ट तेली घराण्यांतील पुरुष या शिखरावर चढून ध्वजा लावतो. ह्या देवीस पहिल्या बाजीराव पेशव्यानें इनाम दिलेला चणकापूर गांव तिच्याकडे चालू आहे.



१२० मुक्ताबाईचें देऊळ-एदलाबाद.

# मुक्ताबाईचें देऊळ—एदलाबाद.

निवृत्तिनाथ, ज्ञानदेव, सोपानदेव व मुक्ताबाई हीं महाराष्ट्रांतील महान् भगवद्भक्त संत ह्मणून प्रसिद्धीस आलेलीं चार भावंडें होत त्यांपैकीं संतमुक्ताबाईनें चांगदेवास गुरूपदेश केला. चांगदेवांनीं तापीतटाकीं ज्या स्थळीं योगाभ्यास केला, त्या स्थळीं वडील बंधु निवृत्तिनाथ यांसह मुक्ताबाई आल्या असतां तेथें त्यांचें देहावसान झालें. पुढें तिच्या भक्तमंडळींनें मुक्ताबाईचें देवालय एदलाबाद येथें बांधिलें. देवालयाच्या सभोंवार कोट असून त्यास चारी दिशांस चार दरवाजे आहेत. पूर्वबाजूच्या दरवाज्यांतून आंत आलें असतां देवालयाचा दिसणारा देखावा चित्रांत दाखविला आहे. देवालयाच्या सभामंडपाचे सभोंवार असलेले खांब, प्रवेशद्वारांतील मुख्य कमान, देवालयावरील कौलारू छप्पर व त्याच्या मागें असणारा देवालयाचा कळस, हीं चित्रांत दिसत आहेत. देवालयांत मुक्ताबाईच्या दोन मूर्ती आहेत. जुनी मूर्ति काळया पाषाणाची असून नवीन स्थापना केलेली मूर्ति संगमरवरी दगडाची आहे. दर एकादशीस भजनी मंडळयांच्या अनेक दिंडया देवदर्शनास येतात व सभामंडपांत त्यांचें अहोरात्र भजन चाललेलें असतें. देवळाच्या पुढील भागीं वीणा घेतलेला एक भक्त व हातांत व खांद्यावर पताका घेऊन खालीं उभे असलेले तीन भक्त चित्रांत दिसतात. मुक्ताबाईच्या देवालयाच्या खर्चाकरितां शिंदे सरकाराकडून जमीन इनाम असून इंग्रज सरकाराकडून ७० रुपयांची वार्षिक नक्त नेमणूक मिळते.

# सखारामबोवांची समाधि–अमळनेर.

पंढरपूरच्या विठोबाचे भक्त निरनिराळ्या काळीं महाराष्ट्राच्या अनेक भागांत अवतीर्ण होऊन त्यांनीं भागवत धर्माचें महत्त्व वाढविलें व लोकांस भक्तिमार्गास लाविलें. अशा साधूंपैकींच **सखाराममहाराज** हे खानदेशांत अमळनेर येथें एकोणीसाव्या शतकाच्या आरंभीं होऊन गेले. लहानपणींच ह्यांचे आईबाप निवर्तले व त्यामुळें त्यांचें बालपण हालअपेष्टांत गेलें. बाळपणापासून ह्यांस विठ्ठलभक्तीचा नाद लागला होता. ते पुढें नियमानें पंढरपूरच्या वाऱ्या करूं लागले. एके वर्षीं ते आषाढीच्या वारीस पंढरपुरास गेले असतां त्यांची भक्ति पाहून विठ्ठलानें त्यांस समक्ष दर्शन दिलें. तेव्हांपासून त्यांची कीर्ति वाढूं लागली व लवकरच ते सखाराममहाराज या नांवानें महाराष्ट्रांत प्रसिद्धीस आले. त्यांनीं अनेक चमत्कार केल्याचें प्रसिद्ध आहे. दुसरे बाजीराव पेशवे व मालेगांवचे राजेबहादर यांची महाराजांचे ठिकाणीं फार भक्ति होती. अमळनेरच्या देशमुखांचे तीन मुलगे पुण्यास कैदेंत होते, ते सखाराममहाराजांचे सांगण्यावरून बाजीरावानें सोडिले, तेव्हां देशमूख महाराजांचे शिष्य झाले. महाराजांचे आज्ञेवरून ह्याच देशमुखांनीं अमळनेरास विठ्ठल मंदिर बांधिलें. महाराज सन १८१८ मध्यें समाधिस्थ झाले.

चित्रांत नदीच्या पात्रांत तीन समाधी व पलीकडे विठ्ठलमंदिर व गांवांतील इमारती दिसत आहेत. ह्या तीन समाधींपैकीं डावीकडील समाधि सखारामबोवांची असून दुसऱ्या दोन समाधी त्यांच्या पश्चात् त्यांच्या गादीवर बसलेल्या पुरुषांच्या आहेत. समाधीचें काम सुबक असून मजबूत आहे. दरसाल येथें वैशाख शुद्ध एकादशी पासून पौर्णिमेपर्यंत महाराजांच्या पुण्यतिथीनिमित्त उत्सव होतो, तेव्हां फार मोठी यात्रा भरते.



१२१ सखाराम बोवाची समाधि—अमळनेर.



१२२ शेखसादातचा दर्गा—नंदुरबार.

# दर्गा—नंदुरबार.

नंदुरबार हें तालुक्याचें गांव पश्चिम खानदेश जिल्ह्यांत असून तापी व्हॅली रेल्वेचें एक स्टेशन आहे. हें शहर मुसलमानी अमदानींत बरेच मोठें, महत्त्वाचें व भरभराटीचें होतें. शहराभोंवतीं त्याच्या पूर्ववैभवाच्या कांहीं खुणा अद्यापि आढळतात. ह्या जुन्या स्थळांपैकींच, नंदुरबारच्या नैर्ऋत्येस पाव मैलावर हजरत सैय्येद अलाउद्दीन नांवाच्या मुसलमान अवलियाचा एक दर्गा आहे. ह्या संबंधीं एक कथा सांगतात ती अशीः—पूर्वी नंदा नांवाचा यादव-वंशीय हिंदु गवळी राजा नंदुरबार येथें राज्य करीत होता. त्याच्यावर मुसलमानांनीं स्वारी केली. तेव्हां मुसलमानांच्या सैन्यांत वरील अवलिया होते. लढाईंत राजानें त्यांचें शीर तोडिलें. तेव्हां अवलियांच्या धडानेंच लढाई करून सर्व हिंदु सैन्यास पळवून लाविलें व मुसलमानांस जय मिळवून दिला. हे अवलिया मूळचे अरबस्तानांतील राहाणारे असून, अजमीर येथील ख्वाजामोईनुद्दीन चिश्ती ह्या अवलियांच्या हुकुमानें नंदुरबार येथील हिंदु राजांबरोबर लढाई करण्यास आले होते असें सांगतात. जय मिळाल्यावर सदरहू अवलियांचें शीर नंदुरबारचे नैर्ऋत्येस एका टेकडीवर नेऊन पुरलें व त्या ठिकाणीं दर्गा बांधिला. चित्रांत दर्ग्यांत जाण्याचा मुख्य दरवाजा दाखविला आहे. दर्ग्याभोंवतीं तट बांधिलेला आहे. तटाच्या आंत मध्यभागीं मुख्य दर्गा आहे. दर्ग्याच्या पायरीवर बसलेले भक्त चित्रांत दिसत आहेत. ह्या दर्ग्याच्या खर्चाकरितां कांहीं जमिनी इनाम दिलेल्या आहेत. मोहोरमच्या १२ व्या तारखेस ह्या पिराचा मोठा उरूस भरतो. भाविक लोक पिरास नवस वगैरे करितात. हे अवलिया इ. स. ६१२ मध्यें शहीद झाले.

# शंकराचार्यांची समाधि–निर्मळ.

निर्मळ हें स्थान ठाणें जिल्ह्यांत वसईपासून सहा मैलांवर आहे. ह्या स्थळीं फार प्राचीन काळीं विमल नांवाचा राक्षस राहात असे. तो लोकांना फार पीडा देऊं लागला, तेव्हां परशुरामानें त्याचा वध केला. ह्मणून त्या क्षेत्रास निर्मळ हें नांव पडलें, अशी एक पौराणिक कथा प्रसिद्ध आहे. ह्या ठिकाणीं विमल व निर्मळ अशीं दोन तीर्थें आहेत. ह्या तीर्थांच्या कांठीं शंकराचें स्वयंभू देवस्थान होतें. पोर्तुगीज लोकांनीं हीं तीर्थें भ्रष्ट करून देवळां-तील मूर्ती फोडिल्या असें सांगतात. इ. स. १७३९ सालीं चिमणाजी अप्पानें वसई काबीज केल्यानंतर पेशव्यांचा वसई प्रांताचा सरसुभेदार शंकराजी केशव ह्यानें विमल व निर्मळ हीं तीर्थें शुद्ध करून त्यांच्या कांठीं घाट बांधिले व बरींच देवळेंही बांधिलीं. त्यांपैकींच शंकराचार्यांच्या समाधीवरील देऊळ हें एक आहे. चित्रांत देवळाचा देखावा दिसत आहे. या देवळांतील समाधि आद्य शंकराचार्यांची आहे असें समजतात; परंतु त्यांनीं काश्मीर प्रांतीं समाधि घेतल्याचें प्रसिद्धच आहे. तेव्हां ही समाधि त्यांच्या गादीवरील कोणातरी आचार्यांची असावी असें दिसतें. ही समाधि निर्मळ गांवानजीकच एका उंच टेकडीवर बांधिलेली आहे. टेकडीवर चढण्यास पायऱ्या बांधून रस्ता केलेला आहे. समाधीच्या मंदिरांत जाण्यास चार बाजूंनीं चार दरवाजे आहेत. दरसाल कार्तिक वद्य एकादशीचे दिवशीं येथें फार मोठी यात्रा भरते. समाधीची व यात्रेची व्यवस्था पंचांमार्फत होत असते.



१२३ शंकराचार्यांची समाधि—निर्मळ.



१२४ वज्रेश्वरीचें देवालय–जिल्हा ठाणें.

# वज्रेश्वरीचें देवालय-जिल्हा ठाणें.

ठाणें जिल्ह्यांत भिंवडीपासून उत्तरेस बारा मैलांवर तानसा नदीच्या कांठीं वडवली नांवाचें एक खेडें आहे. तेथील वज्राबाई अथवा **वज्रेश्वरी** नांवाचीं उन्हाळीं फार प्रसिद्ध आहेत. तेथून अर्ध्या मैलावर एका टेकडीच्या उतारावर **वज्रेश्वरी** नांवाच्या देवीचें एक देवालय आहे. देवळांत जाण्यास बांधिलेल्या पायऱ्या, दरवाजा, नगारखाना, सभामंडपाची इमारत व देवळावरील शिखरें हीं चित्रांत दिसत आहेत. देवळाच्या गाभाऱ्यांत वज्रेश्वरी, कालिका व रेणुका ह्यांच्या तीन काळ्या पाषाणाच्या भव्य मूर्ती आहेत. त्यांतील मधील मुख्य मूर्तीच्या हातांत वज्र आहे, ह्मणून तिला वज्रेश्वरी असें ह्मणतात. देवळाच्या भोंवतीं मोठा तट आहे. देवळाचे मागें टेकडीवर एक लहानशी इमारत चित्रांत दिसते. तींत गोधडीबोवा नांवाच्या देवीच्या एका भक्ताची समाधि आहे. समाधीवर नेहमीं गोधडी घातलेली असते. चिमणाजी अप्पा पेशवे वसईच्या स्वारीवर या वाटेनें जात असतां त्यानें वज्रेश्वरीस असा नवस केला कीं " मी किल्ला सर करून परत आलों तर ह्या ठिकाणीं तुझें मोठें देवालय बांधीन. " त्याप्रमाणें त्याला यश मिळाल्यावर त्यानें हल्लींचें देऊळ बांधिलें व त्याच्या खर्चाकरितां सहा गांवें इनाम दिलीं असें ह्मणतात. हल्लीं ह्या देवस्थानास १९६ रुपयांचें वर्षासन सरकाराकडून चालू आहे. शिवाय इनाम गांवांचें वार्षिक उत्पन्न सुमारें एक हजार रुपये येतें. चैत्र महिन्यांत अमावास्येस येथें मोठी यात्रा भरते. देवालयाची सर्व व्यवस्था देवीच्या इनामदारांमार्फत होत असते.

# हजरत बावा मलंग यांचा दर्गा–कल्याण.

ठाणें जिल्ह्यांत कल्याणपासून दक्षिणेकडे दहा मैलांवर मलंगड नांवाचा एक डोंगरी किल्ला डोंगराच्या एका सुळक्यावर असल्यामुळें चढण्यास फार अवघड आहे. डोंगराचा बराच भाग चढून गेल्यावर किल्ल्याच्याखालीं एके ठिकाणीं दाट झाडींत बरीच सपाट जागा लागते. तेथें हजरत बावा मलंग नांवाच्या मुसलमान अवलियाची कबर आहे. तेथें दरसाल माघ शुद्ध पौर्णिमेस फारच मोठा उरूस भरतो. ह्या कबरीचा मुजावर ब्राह्मण आहे व येथील उरुसास मुसलमानांप्रमाणें हिंदुही जातात. सुमारें ७०० वर्षांपूर्वी मलंगड येथें नळ नांवाचा एक हिंदु राजा राज्य करीत असतां, अरबस्तानांतून हाजी अब् दुर्रह्मान नांवाचे एक मुसलमान अवलिया येऊन ते मलंगडच्या एका भागावर राहूं लागले. राजानें त्यांच्या साधुत्वाची अनेक प्रकारें परीक्षा करून ते जेव्हां राजाच्या कसोटीस उतरले तेव्हां त्यांस हजरत बावा मलंग असें ह्मणूं लागले. ते मलंगपंथी साधु होत. गडावर त्यांच्या कबरीच्या शेजारीं त्यांच्या पत्नीचीही कबर आहे. हा किल्ला मराठ्यांच्या ताब्यांत असतांनां इंग्रजांनीं तो जिंकून घेतला. परंतु इंग्रज तेथें फक्त दोनच वर्षें राहिले. पुढें त्यांनीं तो किल्ला सोडून दिला. हजरत बावा मलंग ह्या साधूंच्या दैवी सामर्थ्यामुळें इंग्रजांना तो किल्ला सोडावा लागला, अशी समजूत होऊन पेशव्यांनीं त्या साधूंच्या कबरीवर घालण्यास एक बहुमूल्य वस्त्र पाठविलें. तें वस्त्र कल्याण येथील काशिनाथपंत केतकर ह्या ब्राह्मण गृहस्थानें त्या कबरीवर नेऊन घातलें. तेव्हांपासून कबरीची व्यवस्था काशिनाथपंतांच्या वंशजांकडेसच चालू आहे. उरुसाचे वेळीं येणाऱ्या साधुपुरुषांस व इतर यात्रेकरूलोकांस खिचडीचा शिधा देण्याचें काम तेच करीत असतात.



१२५ बावा मलंगचा दर्गा—कल्याण.




१२६ कनकेश्वराचें देवालय-जिल्हा कुलाबा.

# कनकेश्वराचें देवालय–जिल्हा कुलाबा.

कनकेश्वर नांवाची १३०० फूट उंचीची टेकडी कुलाबा जिल्ह्यांत अलिबागपासून ईशान्येस आठ मैलांवर आहे. समुद्रकिनाऱ्यापासून तिचें अंतर पांच मैल आहे. ह्या टेकडीच्या माथ्यावर चित्रांत दाखविलेलें कनकेश्वराचें प्रसिद्ध शिवालय आहे. टेकडीवर जाण्यास दक्षिणेच्या बाजूनें दगडी पायऱ्या बांधून फरसबंदी रस्ता केला आहे. ह्या रस्त्याची एकूण लांबी एक मैल असून रस्त्याचे दोहों बाजूंस अशोकवृक्षांची दाट झाडी आहे. वर चढतांना सभोंवतालचा देखावा फारच रमणीय दिसतो. विशेषतः पश्चिमेकडे दृष्टि फेंकिली असतां क्षितिजापर्यंत पसरलेला अफाट समुद्र, त्यांत जणूं तरंगत असलेले अंधेरी व उंदेरी हे दोन किल्ले व मुंबईचें बंदर, असा गंभीर देखावा पाहून एक मैल चढण चढून आलेला थकवा मनुष्य एकदम विसरून जातो. टेकडीच्या अगदीं माथ्यावर मध्यभागीं एक अष्टकोनी कुंड आहे. ह्या कुंडाच्या पश्चिम बाजूस **कनकेश्वराचें** देऊळ आहे. चित्रांत कुंडाची पश्चिम बाजू व पलीकडे असलेलें देऊळ दिसत आहे. कुंडाच्या तीन बाजूंस गणपति, रामेश्वर व लक्ष्मीनारायण यांचीं देवळें, कांहीं दुमजली धर्मशाळा व पूजारी लोकांचीं राहण्याचीं घरें आहेत. कनकेश्वराचें देऊळ फार जुनें आहे. ह्या देवळाच्या बहुकोनी भिंती व लहान कळसांनीं युक्त असा घुमट पाहून ह्या देवळाची बांधणी हेमाडपंती असावी असें वाटतें. देवळाचा गाभारा बराच खोल असून त्यांत अंधार आहे. त्याच्या मध्यभागीं शिवलिंग आहे. देवस्थानास सरकारांतून इनाम जमीन आहे. दरसाल महाशिवरात्र व कार्तिकी पौर्णिमा ह्या दिवशीं येथें मोठी यात्रा भरते.

# हरेश्वराचें देवालय–जिल्हा कुलाबा.

उत्तर कोंकणांत जंजिरा संस्थानच्या दक्षिण हद्दीवर सावित्रीनदीच्या मुखापाशीं **हरेश्वर** नांवाचें एक क्षेत्र आहे. कोंकणांतील प्रसिद्ध क्षेत्रांत ह्याची गणना होते. हरेश्वराचें मंदिर हें समुद्रालगतच एका टेकडीच्या पायथ्याशीं पश्चिमाभिमुख असें बांधिलेलें आहे. हें देवस्थान फार पुरातन असून ह्याची स्थापना भगवान् अगस्ति ऋषींनीं केली अशी कथा पुराणांत प्रसिद्ध आहे. चित्रांत हरेश्वराचें देऊळ व त्याच्या पलीकडील काळभैरवाचें देऊळ दिसत आहे. चित्रावरून मंदिराची रचना फार साधी आहे असें दिसून येईल. हरेश्वराच्या देवळाचा गाभारा सुमारें एक पुरुष खोल असून तेथें बराच अंधार आहे, ह्यामुळें दिवसाही तेथें दिवे लावावे लागतात. गाभाऱ्यांत एकाच शाळुंकेवर एका रांगेंत चार पिंडी आहेत. हीं ब्रम्हा, विष्णु, महेश व पार्वती ह्यांचीं प्रतीकें मानितात. हरेश्वराच्या मंदिराच्या पश्चिमेस समोरच काळभैरवाचें पूर्वाभिमुख मंदिर आहे. तें चित्रांत दिसत आहे. ह्यांत जोगेश्वरी व बहिरी ह्या देवतांच्या उभ्या मूर्ती आहेत. ह्या ठिकाणीं पिशाच्चबाधा झालेल्या मनुष्यास गूण येतो, असा लोकांचा भरंवसा आहे. ह्मणून कधीं कधीं पिशाच्चानें पछाडलेले लोक येथें भैरवसेवेकरितां येतात. भैरवाची आरती सुरू झाली कीं, पिशाच्चपीडित माणसें खेळूं व बोलूं लागतात. हरेश्वराच्या मंदिराच्या नैर्ऋत्येस सुमारें अर्धा मैल अंतरावर समुद्रांत शुक्रतीर्थ आहे. त्याचें महात्म्य पुराणांत फार वर्णिलें आहे. ह्या तीर्थास जातांना वाटेंत विष्णुपद लागतें. शुक्रतीर्थाच्या पूर्वेस गायित्री–सावित्रीचें संगमतीर्थ असून त्याच्या ईशान्य दिशेस ब्रह्मगिरि नांवाचा लहानसा डोंगर आहे. तीर्थास केलेली प्रदक्षिणा दीड मैल होते. हरेश्वर येथें कार्तिक शुद्ध एकादशीस व महाशिवरात्रीस यात्रा भरते.



१२७ हरेश्वराचें देवालय–जिल्हा कुलाबा.




१२८ परशुरामाचें देऊळ—चिपळूण.

# परशुरामाचें देऊळ–चिपळूण.

रत्नागिरी जिल्ह्यांत चिपळूण गांवापासून तीन मैलांवर एका लहानशा टेकडीवर परशुरा नांवाचें एक लहानसें गांव वसलेलें असून त्याच्या मध्यभागीं चित्रांत असलेलें परशुरामाचें देऊळ आहे. विष्णूच्या दहा अवतारांपैकीं **परशुराम** हा सहावा अवतार असून त्याच्या अवतारकृत्यांच्या कथा ए त प्रसिद्ध आहेत. त्यानें समुद्रावर बाण मारून सह्याद्रीपर्यंत पसरलेलें समुद्राचें पाणी मागें पश्चिमेकडे हटविलें व नवीन जमीन निर्माण केली, अशी एक पौराणिक कथा असल्यामुळें, हल्लींच्या कोंकणपट्टीस 'परशुरामक्षेत्र' असें ह्मणतात. परशुरामाचें देवस्थान हें फार प्राचीन आहे. पहिल्या बाजीराव पेशव्याचे गुरु धावडशीकर ब्रह्मेंद्रस्वामी ह्यांनीं ह्या देवळाचा जीर्णोद्धार करून बांधिलेलें दगडी देवालय चित्रांत दिसत आहे. देवळाच्या पुढें लाकडी सभामंडप आहे. देवळाच्या मागील बाजूस कळस असलेलें लहानसें देऊळ परशुरामाच्या आईचें (रेणुकेचें) आहे. ह्या देवळाजवळ तीर्थोदकाचा एक लहानसा झरा आहे. त्यास बाणगंगा असें म्हणतात. मुख्य देवळाचें काम साधें पण मजबूत आहे. देवळाच्या आवारांत सर्वत्र फरशी केली असून त्याच्या भोंवतीं दगडी तट आहे. हें परशुरामक्षेत्र फार प्रसिद्ध असून तेथें दूरदूरचे यात्रेकरू येतात. दरवर्षीं वैशाखमासीं अक्षय्यतृतीयेस परशुरामजयंतीनिमित्त येथें मोठा उत्सव होतो. ह्या देवस्थानास १५०० रुपयांचें वर्षासन आहे. शिवाय तीन गांवें इनाम आहेत. देवस्थानाची सर्व व्यवस्था पंचांमार्फत चालते.

# गणपतीचें देवालय–पुळें.

महाराष्ट्रांत गणपतीचीं एकंदर आठ स्थानें विशेष प्रसिद्ध आहेत. तेथील आठ गणपतींस अष्टविनायक असें ह्मणतात. त्यांपैकींच पुळें येथील **गणपति** हा एक होय. पुळें हें गांव रत्नागिरीच्या उत्तरेस सहा कोसांवर समुद्र-कांठीं वसलेलें आहे. समुद्राच्या किनाऱ्यावर असलेल्या एका डोंगराच्या पायथ्याशीं गणपतीचें देवालय पश्चिमाभिमुख असें बांधिलेलें चित्रांत दिसत आहे. देवळाच्या पुढें सभामंडप असून आंतल्या बाजूस गाभारा आहे. त्यांत गणपतीची स्वयंभू मूर्ति आहे. देवळाच्या मागें जो डोंगर दिसतो त्यास गोल डोंगर असें नांव आहे. ह्या डोंगरास गणपतीची निराकार मूर्ति असें समजून लोक पवित्र मानितात व देवळासह ह्या डोंगरास प्रदक्षिणा घालितात. ही प्रदक्षिणा सुमारें अर्ध्या मैलाची आहे. दक्षिण महाराष्ट्रांतील सांगली, मिरज, कुरुंदवाड, जमखिंडी येथील पटवर्धन घराण्यांतील संस्थानिक पुळें येथील गणपतीला आपलें कुलदैवत मानितात. ह्या घराण्यांतील पुरुषांनीं या देवस्थानास पुष्कळ नेमणुका करून दिल्या असून ते त्याच्या दर्शनास वारंवार जातात. देवळाचा सभामंडप श्रीमंत सांगली-करांनीं बांधिला. देवळानजीक असणारी धर्मशाळा थोरल्या माधवराव पेशव्यांची पत्नी सती रमाबाई हिनें बांधिली. गांवांतील व प्रदक्षिणेच्या वाटेवरील फरसबंदी रस्ता बुंदेले सरदार ह्यांनीं बांधिला. पेशवाईतील एक मामलेदार पर-शुराम रामचंद्र ह्यानें देवाचा जामदारखाना बांधिला व बाग तयार केली. येथील गणपतीचे उत्सव वर्षांतून दोनदां होतात. एक भाद्रपद शुद्ध प्रतिपदेपासून पंचमी पर्यंत व दुसरा माघ शुद्ध प्रतिपदेपासून पंचमीपर्यंत. ह्यांपैकीं दुसरा उत्सव विशेष थाटाचा असतो.



१२९ गणपतीचें देवालय—पुळें.



१३० गंगाकुंडें—राजापूर.

# गंगाकुंडें–राजापूर.

रत्नागिरी जिल्ह्यांतील राजापूर गांवापासून आग्नेयीस सुमारें दोन मैलांवर उन्हाळें नांवाचें एक लहानसें गांव आहे. तेथें एक उष्णोदकाचा झरा सतत वाहात असतो. त्या झऱ्यापासून जवळच एका मैलावर एका जागेंतून दोन अडीच वर्षांनीं एकाद्या वेळीं उष्ण पाण्याचा प्रवाह जोरानें वाहूं लागतो. गेल्या कित्येक वर्षांच्या अनुभवावरून ह्या अकस्मात् उत्पन्न होणाऱ्या प्रवाहासंबंधीं असें सांगतां येईल कीं, हा प्रवाह बहुधा उन्हाळ्यांत सुरू होऊन सरासरी दोनतीन महिने सतत वाहतो व एकदां बंद झाल्यावर पुन्हां केव्हांही दोन वर्षांच्या आंत सुरू होत नाहीं. ह्या प्रवाहास हिंदुलोक ‘ गंगा ’ समजून पूज्य मानितात. गंगेचें आगमन झालें ही वार्ता प्रसिद्ध होतांच हजारों यात्रेकरू लांब लांबच्या ठिकाणांहून गंगेच्या स्नानाकरितां राजापुरास येतात. दोन तीन महिने प्रवाह असेपर्यंत राजापुरास क्षेत्राचें स्वरूप येऊन तेथें मोठी यात्रा जमते. यात्रेकरूंच्या स्नानाच्या सोयीकरितां तेथें दगडाचीं चौदा कुण्डें बांधून त्यांत गंगेचें पाणी सोडिलें आहे. चित्रांत हीं कुण्डें दिसत आहेत. त्यांपैकीं ज्या कुण्डांत एक मनुष्य उभा आहे, तेंच मुख्य कुंड होय. तेथेंच प्रथम **गंगा** येते. त्यास काशीकुण्ड ह्मणतात. यात्रेकरूंच्या सोयीकरितां नजीकच कांहीं धर्मशाळा बांधिलेल्या आहेत. चित्रांतील देखाव्याकडे पाहिलें असतां गंगेचा प्रवाह सुरू नसतांना हें चित्र काढिलें आहे, हें सहज दिसून येईल. सरकारांतून ह्या गंगेच्या देवस्थानास वार्षिक ६० रुपयांची नेमणूक आहे. हा आकस्मिक गंगाप्रवाह ह्मणजे नैसर्गिक वक्रनलिका यंत्राचें ( सायफन्चें ) कार्य होय असें ह्यासंबंधीं आधुनिक शास्त्रीय मत आहे. ही गंगा अलीकडे गेल्या दहाबारा वर्षांत मुळींच प्रकट झालेली नाहीं.

# भाग चौथा व पांचवा.

## प्राचीन शिल्पकलेचीं व सृष्टिसौंदर्याचीं प्रसिद्ध स्थळें.

महाराष्ट्रांतील प्राचीन शिल्पकलेच्या दृष्टीनें महत्त्वाचीं अशीं लेणीं व देवालयें ह्यांसंबंधीं प्रसिद्ध असणारीं स्थळें नकाशांत दाखविलीं आहेत. डोंगरांतील खडक पोखरून तयार केलेल्या इमारतीस लेणें असें ह्मणतात. अशीं लेणीं हिंदुस्तानांत बऱ्याच ठिकाणीं आहेत. महाराष्ट्रांत कऱ्हाड, कार्लें, भाजें, नासिक, कान्हेरी, जोगेश्वरी व घारापुरी येथील लेणीं विशेष दर्शनीय आहेत. हीं सर्व प्राचीन लेणीं त्यांतील प्रचंड खोदकामाच्या व शिल्पकलेच्या कौशल्याच्या दृष्टीनें सर्व जगाचें कौतुकस्थान झालीं आहेत. लेण्यांप्रमाणेंच हिंदूंचीं कांहीं जुनीं देवळें शिल्पशास्त्राच्या दृष्टीनें नांवाजलेलीं आहेत. अशीं देवळें नासिक जिल्ह्यांत नासिक व सिन्नर, पश्चिम खानदेशांत बलसाणें, ठाणें जिल्ह्यांत अंबरनाथ व रत्नागिरी जिल्ह्यांत संगमेश्वर येथें आहेत.

सृष्टिसौंदर्याविषयीं प्रसिद्ध असलेलीं स्थळेंही नकाशांत दाखविलीं आहेत. त्यांपैकीं बहुतेक सह्याद्रीवर असून त्यांवरून सभोंवतालचीं उंच पर्वतशिखरें, खोल दऱ्या, दाट झाडी, धबधबे व नद्यांचे प्रवाह यांचा रमणीय देखावा दृष्टीस पडतो. हीं स्थळें समुद्रसपाटीपासून फार उंचीवर असल्यामुळें येथील हवा साधारणपणें थंड व कोरडी असते. ह्मणून हीं उन्हाळ्यांतील श्रीमंत लोकांचीं हवा खाण्याचीं ठिकाणें ह्मणून प्रसिद्ध आहेत. सातारा जिल्ह्यांतील महाबळेश्वराची व पांचगणीची उंची समुद्रसपाटीपासून अनुक्रमें ४५०० व ४३०० फूट आहे. कुलाबा जिल्ह्यांतील माथेरान हें २७०० फूट उंच आहे. पुणें जिल्ह्यांतील लोनावळें व खंडाळें हीं सुमारें २००० फूट उंच आहेत.

जळगांव
बलसाणें
धुळें
अजंठा
नाशिक
पांडुलेणी
सिन्नर
कान्हेरी
अंबरनाथ
ठाणें
मुंबई
घारापुरी
माथेरान
खंडाळा
कार्ली
भाजें
लोणावळा
पुणें
नगर
अलिबाग
सोलापूर
महाबळेश्वर
पांचगणी
सातारा
कऱ्हाड
रत्नागिरी
संगमेश्वर

प्राचीन शिल्पकलेचीं व
सृष्टि सौंदर्याचीं स्थळें.

१३१ प्राचीन शिल्पकलेचीं व सृष्टिसौंदर्याचीं प्रसिद्ध स्थळें.



१३२ आगाशिवाचें लेणें—कऱ्हाड.

# भाग चौथा.

## आगाशिवाचीं लेणीं-कऱ्हाड.

सातारा जिल्ह्यांत कऱ्हाडच्या नैर्ऋत्येस सुमारें पांच मैलांवर आगाशिवाच्या डोंगरांत बुद्धकालीन लेणीं आहेत. प्राचीन शिल्पकलेच्या दृष्टीनें हीं लेणीं बरींच प्रसिद्ध आहेत. स्थानपरत्वें ह्या लेण्यांचे मुख्य तीन वर्ग होतात. जखिनवाडी नांवाच्या गांवाजवळ असलेल्या दक्षिण बाजूच्या तेवीस लेण्यांचा पहिला वर्ग होय. डोंगराच्या उत्तरेकडील फाट्याच्या आग्नेयीस असणाऱ्या एकोणीस गुहांचा दुसरा वर्ग होय. तिसऱ्या वर्गांतील बावीस लेणीं कोयना खोऱ्याच्या बाजूस बऱ्याच अंतरावर पसरलेलीं आहेत. या तीन वर्गांतील मिळून चौसष्ट लेण्यांशिवाय अनेक अति लहान गुहाही या डोंगरांत दिसतात.

आगाशिवाच्या डोंगरांतील हीं लेणीं आकारानें फारच लहान असून त्यांतील चैत्य फारच साधे आहेत. या लेण्यांतून चोहोंकडे निजण्याकरितां तयार केलेले दगडाचे लांब व अरुंद ओटे दिसतात. या लेण्यांत खांब फारसे नसून कोरिलेल्या मूर्तीही कोठें दिसत नाहींत. यांच्या ह्या प्राचीन स्वरूपावरून या गुहा फार जुन्या असाव्या असें अनुमान निघतें. हीं लेणीं अति खडबडीत व मऊ अशा दगडांत कोरिलीं असल्यामुळें तेथें शिलालेख फार दिवस टिकणें शक्यच नव्हतें. परंतु एक दोन ठिकाणीं आढळलेल्या अति अस्पष्ट व तुटलेल्या लेखाक्षरांवरून हीं लेणीं ख्रिस्तीसनापूर्वींचीं ह्मणजे पुणें जिल्ह्यांतील कार्लें येथील लेण्यांच्या वेळचींच असावीं असें दिसतें. या लेण्यांच्या पहिल्या वर्गांतील ६ व्या नंबरच्या गुहेचा दर्शनी भाग चित्रांत दाखविला आहे.

# कार्लें येथील लेणीं–जिल्हा पुणें.

पुणें जिल्ह्यांत जी. आय्. पी. रेल्वेच्या मळवली स्टेशनापासून पूर्व दिशेस सुमारें तीन मैलांवर कार्लें येथील प्रसिद्ध लेणीं आहेत. येथील शिलालेखांवरून हीं लेणीं इ. स. पूर्वी सुमारें ८० वर्षांच्या कालांत कोरिलीं असावीं असें दिसतें. ह्या लेण्यांतील चैत्य व स्तूप चित्रांत दाखविला आहे. चैत्य ह्मणजे बौद्धांच्या उपासनेची जागा होय. हे चैत्य बहुतेक मुंबई इलाख्यांतच आहेत. बौद्धांचे चैत्य व हिंदूंचीं देवालयें ह्यांच्यांत रचनेसंबंधीं मुख्य भेद हा कीं, हिंदूंचीं देवळें बाहेरून सुशोभित केलेलीं असतात, पण चैत्य हे डोंगरांत पोखरलेले असून त्यांतील सर्व करामत काय ती आंतल्या बाजूस असते.

चित्रांत दिसणारा चैत्य हिंदुस्तानांतील सर्व चैत्यांत अत्यंत विस्तीर्ण व शिल्पकलेच्या दृष्टीनें सर्वांत श्रेष्ठ आहे. त्याच्या मध्यभागीं जो देवळाच्या घुमटासारखा भाग दिसत आहे तो स्तूप होय. गौतमबुद्धाच्या शरिराचा कांहीं अवशिष्ट अंश अगर चिन्ह पुरून त्यावर एक वाटोळा भरीव टोप रचीत त्यास स्तूप ह्मणतात. ह्या स्तूपावर नक्षीचें सुंदर काम केलेलें आहे. स्तूपाच्या दोन्ही बाजूंस व मागेंही वाटोळ्या खांबांच्या ओळी दिसतात. खांबांच्या वरच्या बाजूस सुंदर मूर्ती कोरिलेल्या असून त्यांवरील शिल्पकाम प्रेक्षणीय आहे. ह्या चैत्यांचा एकंदर देखावा फारच सुंदर व रमणीय दिसतो. एकांतवासांतील शांततेचें चित्र येथें मनावर चांगलें उमटतें. ह्या चैत्यापासून जवळच दुमजली सात खोल्यांची रांग आहे. ह्या खोल्या बौद्ध लोकांच्या राहण्याच्या जागा होत व त्यांस ‘ विहार ’ असें ह्मणतात.



१३३ कार्लें येथील चैत्य व स्तूप.



१३४ भाजें येथील चैत्य.

# भाजें येथील लेणीं–जिल्हा पुणें.

पुणें जिल्ह्यांत जी. आय्. पी. रेल्वेच्या मळवली स्टेशनापासून दक्षिणेस सुमारें दोन मैलांवर भाजें नांवाचें एक लहानसें खेडें आहे. तेथें जवळच एका डोंगरावर ४०० फूट उंचीच्या खडकांत सुमारें १८ लेणीं आहेत. हीं लेणीं बौद्ध लोकांनीं इसवीसनाच्या पूर्वी पहिल्या व दुसऱ्या शतकांत कोरिलीं असावींत असें तज्ज्ञांचें मत आहे. मुंबई इलाख्यांतील लेण्यांत हीं सर्वांत प्राचीन समजलीं जातात. ह्यांतील कांहीं लेण्यांत चैत्य अथवा प्रार्थनागृहें आहेत. बाकीचीं लेणीं राहण्याकरितां कोरिलेलीं आहेत. इतर अनेक ठिकाणीं कोरिलेल्या लेण्यांत व येथील लेण्यांत मुख्य फरक असा दिसतो कीं, या लेण्यांच्या आंतील बाजूस विशेष कोरीव काम नसून चैत्याच्या बाहेरील बाजूस मात्र कांहीं आकृति कोरिलेल्या दिसतात. लेण्यांतील खांब, छत, भिंती व कमानी ह्यांवरही फारसें नक्षीकाम दिसत नाहीं. येथील मुख्य चैत्याच्या समोरील बाजूचा देखावा चित्रांत दाखविला आहे. हा चैत्य सर्वांत जुना असून दोन हजार वर्षें ऊन, वारा, पाऊस सोसून जीर्ण स्थितींतही प्राचीन बौद्ध लोकांची धर्मश्रद्धा, कल्पकता, शिल्पकला-नैपुण्य व प्रचंड उद्योग ह्यांची साक्ष आजमितीस देत आहे.

# पांडवलेणीं–नासिक.

नासिक शहराच्या नैर्ऋत्येस पांच मैलांवर १०६१ फूट उंचीच्या एका टेकडींत बौद्धांचीं लेणीं आहेत. हीं लेणीं बौद्धांनींच कोरिलीं अशाबद्दल त्यांतील शिलालेख, मूर्ती वगैरेवरून स्पष्ट पुरावा मिळत असतां, तीं पांडवकृत्यें आहेत असें समजून कांहीं लोक त्यांस पांडवलेणीं असें म्हणतात. हीं लेणीं अतिशय बळकट खडकांत कोरिलीं असल्यामुळें त्यांवरील शिलालेख हे दोन हजार वर्षांच्या दीर्घकालानंतरही आज बहुतेक शाबूत आहेत. हीं लेणीं चोवीस असून त्यांपैकीं एकच चैत्य आहे. तो चित्रांत दाखविला आहे. बाकीचीं लेणीं हीं बौद्ध लोकांच्या राहण्याच्या जागा आहेत. त्यांतील भिंतींत कोरिलेल्या मूर्ती व खोदीव काम पाहण्यासारखें आहे. परंतु या लेण्यांची विशेष प्रसिद्धि व महत्त्व त्यांतील शिलालेखांमुळेंच आहे. हे शिलालेख सत्तावीस असून ते लेण्यांच्या भिंतींवर व खांबांवर प्राकृत भाषेंत कोरिले आहेत. हे इसवीसनापूर्वींचे आहेत. ह्यामुळें ऐतिहासिकदृष्ट्या ह्या लेखांचें महत्त्व फारच समजलें जातें. नंबर १९ च्या लेण्यांत सर्वांत जुना ह्मणजे इ० सनापूर्वीं ११० वर्षांतला जो शिलालेख आहे, तो पुढें दिला आहे. "सादन वाहन कुले कन्हे राजिनी नासिकेन । संमणेन महामातेण लेण कारितं ।" ह्याचा अर्थ शातवाहन कुलांतील कृष्ण राजा राज्य करीत असतां नासिक येथील मोठ्या श्रमण प्रधानानें हें लेणें केलें असा आहे.



१३५ पांडवलेण्यांतील चैत्य—नाशिक.



१३६ रामेश्वराचें देऊळ—नाशिक.

# नारोशंकराचें देऊळ–नासिक.

नासिक येथील नारोशंकराचें देऊळ ह्मणून प्रसिद्ध असलेलें रामेश्वराचें मंदिर चित्रांत दाखविलें आहे. प्राचीन शिल्पकलेच्या दृष्टीनें तें फार प्रसिद्ध आहे. हें गोदावरीच्या डाव्या तीरावर पूर्वेस आहे. या देवालयांत दगडावरील कोरीव काम पुष्कळ असून त्यावरून त्यावेळच्या कारागिरांची कल्पकता व कौशल्य हीं दिसून येतात. हें देऊळ सभोंवार दगडी तट असलेल्या १२४ फूट लांब व ८३ फूट रुंद अशा जागेवर मध्यभागीं बांधिलेलें आहे. महाद्वार, सभामंडप व गाभारा असे या देवळाचे मुख्य ती भाग आहेत. दरवाज्यांत पूर्वाभिमुख नंदी असून गाभाऱ्यांत शिवलिंग आहे. गाभाऱ्यावर उंच शिखर आहे तें चित्रांत दिसत आहे. या देवालयाच्या सभोंवार असलेल्या दगडी तटाची वरील बाजू ११ फूट रुंद आहे. तटाच्या चार कोपऱ्यां चार व पश्चिम तटाच्या मध्यभागीं एक असे पांच घुमट तटावर बांधिलेले आहेत. पश्चिम तटावरील घुमटांत एक मोठी घंटा आहे. देवळाची वरची बाजू व शिखर ह्यांवर फारच सुंदर कोरीव काम केलेलें आहे. तें चित्रांत दाखविलें आहे. मुख्य दरवाज्याच्या कमानीवर व देवळाच्या बाहेरील भिंतींच्या कोपऱ्यांतूनही अनेक लहान लहान मूर्ती मोठ्या कुशलतेनें कोरिलेल्या दिसतात. हें देवालय नासिक जिल्ह्यांतील मालेगांवचे प्रसिद्ध सरदार नारोशंकर राजेबहाद्दर यांनीं इ. स. १७४७ त सुमारें १८ लाख रुपये खर्च करून बांधिलें असें ह्मणतात.

# गोंदेश्वराचें देऊळ–सिन्नर.

नासिक जिल्ह्यांतील सिन्नर ह्या गांवीं असलेलें गोंदेश्वराचें देवालय चित्रांत दिसत आहे. हें देऊळ सुमारें ८०० वर्षांपूर्वी यादव वंशांतील राव गोविंद नांवाच्या एका गवळी राजानें बांधिलें असें ह्मणतात. २२३ फूट लांब, १९४ फूट रुंद व ७ फूट उंच अशा दगडी चौथऱ्याच्या हें मध्यभागीं असून त्याच्या चार कोपऱ्यांस विष्णु, गणपति, सूर्य व देवी ह्यांचीं चार लहान देवळें आहेत. चित्रांत मध्यभागीं गोंदेश्वराच्या देवळाचा मुख्य भाग दिसत असून डाव्या बाजूस विष्णूचें लहान मंदिर दिसत आहे. ह्या सर्व देवळांचें काम हेमाडपंती असून हीं देवळें प्राचीन शिल्पकलेचा उत्कृष्ट नमुना ह्मणून हल्लीं प्रसिद्ध आहेत. देवळाच्या बाहेरच्या बाजूंस व आंतील खांब व छत ह्यांवर उत्तम प्रकारचें कोरीव काम केलेलें आहे. मुख्य देवळाची लांबी ७५ फूट, रुंदी ६० फूट व उंची ५३ फूट आहे. बाजूच्या चार देवळांची बांधणी मुख्य देवळाच्या नमुन्याप्रमाणेंच आहे. परंतु तीं देवळें आकारानें लहान आहेत. ह्या देवळांतील मूर्ती व कांहीं नक्षीकाम मुद्दाम नाश केल्याप्रमाणें दिसतें. सन १९०१ सालीं मुख्य देवळावर वीज पडून त्याचा कळस खालीं पडला. अशा प्राचीन व सुंदर इमारतीस विजेपासून पुन्हां अपाय होऊं नये ह्मणून सरकारनें ह्या देवळावर विद्युत्संरक्षक अशा तांब्याच्या पट्टीची योजना केली आहे. सन १९१४ पासून हीं देवळें हिंदुस्तानसरकारच्या पुराणवस्तु–संरक्षक–खात्याच्या ताब्यांत गेलीं आहेत व त्याच्यामार्फत देवळांची दुरुस्ती होत असते.



१३७ गोंदेश्वराचें देऊळ—सिन्नर.



१३८ बलसाण्याचें देवालय—जिल्हा प० खानदेश.

# बलसाण्याचें देवालय–जिल्हा प० खानदेश.

पश्चिम खानदेश जिल्ह्यांतील साकरी तालुक्यांत निजामपूरच्या ईशान्येस सुमारें दहा मैलांवर बलसाणें नांवाच्या गांवांत फार जुनीं देवालयें आहेत. त्यांपैकीं गांवाच्या बाहेर असलेल्या एका देवालयाचें चित्र येथें दाखविलें आहे. हें देवालय चौदाव्या शतकांत यादव वंशांतील रामदेव नांवाच्या राजाच्या कारकीर्दींत त्याचा प्रधान हेमाद्रि यानें बांधिलें. ह्मणून यास हेमाडपंती देवालय असें ह्मणतात. देवालयाचें सर्व काम दगडी असून फार मजबूत आहे. देवालयाच्या पुढील भागीं चारी बाजूंस चार खांब देऊन त्यांवर उंच दगडी घुमट बसवून देवालयाचें प्रवेशद्वार तयार केलें आहे. देवळाचे एकंदर तीन भाग आहेत. पुढील दरवाज्याचा भाग, सभामंडप व आंतील गाभारा. दरवाजा १२ फूट उंचीचा असून सभामंडप अठरा चौरस फूट आहे व त्याचे खांब १० फूट उंच आहेत. देवालयाच्या आंतील व बाहेरील खांबांवर हात जोडलेल्या निरनिराळ्या सुंदर मूर्ती कोरिलेल्या आहेत. देवालयाच्या दगडी छतावरही आंतील बाजूस अनेक पौराणिक देखावे कुशलतेनें कोरिले आहेत. देवळाचा गाभारा लहान असून तेथें बराच अंधार आहे. गाभाऱ्यांत शिवलिंग असून मागच्या बाजूस शंकराची मूर्ति कोरिलेली आहे. बलसाणें येथील हीं देवालयें प्राचीन कलाकौशल्याच्या निपुणतेची साक्ष देत आहेत. देवालयें बांधून बराच काळ लोटला तरी तीं अद्याप चांगल्या स्थितींत आहेत. यावरून त्या वेळचें बांधकाम किती मजबूत होतें हें दिसून येईल.

# कान्हेरी येथील लेणीं–जिल्हा ठाणें.

ठाणें जिल्ह्यांत बी. बी. अँड् सी. आय्. रेल्वेच्या बोरिवली स्टेशनापासून पूर्व दिशेस सुमारें पांच मैलांवर हीं लेणीं अगदीं एकांतस्थानीं डोंगरांत कोरिलेलीं आहेत. ह्यांची संख्या १०२ असून त्यांपैकीं २७ मोठीं, ५६ लहान व बाकीचीं अगदीं पडक्या स्थितींत आहेत. हीं लेणीं ह्मणजे प्राचीन काळच्या बौद्धांची मोठी वसाहतच होय. त्यांच्याकरितां रहाण्याच्या खोल्या, प्रार्थनामंदिरें, सभागृहें, समाधिस्थानें ह्या सर्वांची सोय ह्या लेण्यांतून केलेली होती. ह्या लेण्यांतील शिलालेखांवरून हीं लेणीं इ०स० च्या दुसऱ्या शतकांत तयार झालीं असें दिसतें. लेण्यांत ठिकठिकाणीं उत्तम कोरीव काम केलेलें आहे. नंबर ३ च्या प्रसिद्ध चैत्याबाहेर २५ फूट उंचीच्या दोन स्त्रीपुरुषांच्या प्रचंड मूर्ती आहेत, त्या चित्रांत दाखविल्या आहेत. या चैत्याच्या बाहेरील दोन खांबांवर असलेल्या शिलालेखांवरून या चैत्याचें काम शातकर्णी गौतमी पुत्र याच्या कारकीर्दींत ( इ० स० १८० ) गजसेन व गजमित्र नांवांच्या दोन बंधूंनीं केलें असें दिसतें; व त्यांच्याच मूर्ती त्यांच्या पत्नींसह चैत्याच्या बाहेर कोरिल्या आहेत असें ह्मणतात. हिंदुस्तानांत बौद्ध धर्माचा ऱ्हास इ० स० च्या ६ व्या शतकांत झाला. तरी त्यानंतर कान्हेरी लेण्यांत बौद्धांची वस्ती होती. ह्यामुळें सन १५३४ मध्यें जेव्हां पोर्तुगीज लोकांनीं साष्टी बेट घेतलें, तेव्हां ह्या लेण्यांमध्यें त्यांना बौद्ध लोक आढळले. हीं लेणीं जरी पूर्णपणें बौद्धांचीं आहेत तरी सामान्य लोकांत हीं पांडवांनीं कोरिलीं असा समज आहे. येथें दरवर्षीं कार्तिकी एकादशीस व महाशिवरात्रीस मोठी यात्रा भरते.



१३९ कान्हेरी लेण्यांतील मूर्ती–जिल्हा ठाणें.



१४० जोगेश्वरीचें लेणें—जिल्हा ठाणें.

# जोगेश्वरीचें लेणें—जिल्हा ठाणें.

ठाणें जिल्ह्यांत बी. बी. अँड् सी. आय्. रेल्वेच्या जोगेश्वरी स्टेशनापासून आग्नेयी दिशेस सुमारें अर्ध्या मैलावर डोंगरांत कोरिलेलें एकच लेणें आहे, तें हिंदुस्तानांतील सर्व लेण्यांमध्यें मोठेपणाच्या दृष्टीनें दुसऱ्या नंबरचें आहे. पहिला नंबर वेरूळ येथील कैलास लेण्याचा व दुसरा नंबर ह्या जोगेश्वरी येथील लेण्याचा. लेण्याच्या पुढील भागीं २० फूट उंच व १८ फूट रुंद अशी एक भव्य कमान आहे. ह्या कमानीच्या दोन्ही बाजूंस दोन दालनें आहेत. उजव्या बाजूच्या दालनांत एक मोठी शिवाची मूर्ति ध्यानस्थ स्थितींत कोरिलेली आहे व डाव्या दालनांत शिव तांडव करीत आहेत असें चित्र कोरिलें आहे. कमानीच्या समोरच्या भिंतींत एक मोठा सुंदर नक्षी असलेला दरवाजा आहे. त्यांतून आंत गेलें असतां एक मोठें दालन लागतें. हाच लेण्याचा मुख्य भाग होय. ह्याच्या आंत उजेड कमी असून तळाचा भाग ओलसर आहे. भोंवतालच्या चार भिंतींपासून सुमारें १७ फुटांवर प्रत्येक बाजूस सहा, ह्याप्रमाणें चोहों बाजूंस मिळून चोवीस खांब कोरिलेले आहेत. त्यांपैकीं कांहीं चित्रांत दिसत आहेत. हें लेणें ८ व्या शतकांत हिंदूंनीं कोरिलें असावें असें दिसतें.

# अंबरनाथाचें देवालय—कल्याण.

ठाणें जिल्ह्यांत कल्याणपासून चार मैलांवर अंबरनाथ नांवाचें एक आगगाडीचें स्टेशन आहे. तेथून पश्चिमेस सुमारें एक मैलावर अंबरनाथाचें दगडी भव्य देवालय आहे. तें प्राचीन शिल्पकला व कोरीव काम ह्यांच्या दृष्टीनें अत्यंत प्रेक्षणीय आहे. तें इ० स० १०५० च्या सुमारास बांधिलें असावें असें तेथील शिलालेखावरून दिसतें. देवळाची लांबी ८४ फूट असून रुंदी ६० फूट आहे. त्याचे बहुतेक भाग अद्यापि चांगल्या स्थितींत आहेत. देवळाची बांधणी हेमाडपंती आहे व त्यास तीन दरवाजे आहेत. पश्चिमेच्या बाजूचा मुख्य दरवाजा चित्रांत दिसत आहे. देवळाच्या बाहेरच्या व आंतल्या बाजूनें दगडावर फारच सुंदर कोरीव काम केलेलें आहे. चित्रांत बाहेरच्या भिंतीवरील व खांबांवरील काम दिसत आहे. इमारतीच्या आंतील भिंती, खांब, छत ह्यांवरचेंही कोरीव काम प्रेक्षणीय आहे. ठिकठिकाणीं निरनिराळ्या देवता, सिंह, हत्ती, नाचणाऱ्या स्त्रिया, वाद्यें वाजविणारे लोक ह्यांचीं चित्रें कोरिलीं आहेत. दगडावर कोरिलेली नक्षी ही तर इतकी सुबक, प्रमाणशीर व भूमितीच्या निरनिराळ्या आकृतींनीं रचिलेली आहे कीं, युरोपियन शिल्पशास्त्रज्ञ लोक तिची फार प्रशंसा करितात. देवळाचा गाभारा १३ चौरस फूट असून सात फूट खोल आहे. ह्या देवळांतील गणपति, नंदी, देवी ह्यांच्या मूर्ती फुटलेल्या असून मुख्य शिवलिंगासही मोठी भेग गेलेली आहे. देवळाच्या आवारासभोंवतीं एक दगडी तट आहे. तो कांहीं ठिकाणीं पडलेला आहे. देवळापासून कांहीं अंतरावर २७ यार्ड लांब व २४ यार्ड रुंद असें तळें आहे. देवाचा पूजारी कोळी जातीचा आहे. येथें दरवर्षीं महाशिवरात्रीस मोठी यात्रा भरते.



१४१ अंबरनाथाचें देवालय—कल्याण.



१४२ घारापुरी येथील लेणें–जिल्हा कुलाबा.

# घारापुरी येथील लेणीं-जिल्हा कुलाबा.

एलिफंटा नांवाचें लहानसें बेट मुंबईच्या पूर्वेस सुमारें सात मैलांवर आहे. या बेटाची उंची सुमारें ६०० फूट असून तेथें दाट झाडी आहे. मुंबईहून कुलाबा जिल्ह्यांत उलव्याकडे जाणारी आगबोट ह्या बेटांतील बंदरांत थांबते. ह्या बेटाचें जुनें नांव घारापुरी असें आहे. परंतु ह्या बेटाच्या खडकांत एक मोठा हत्ती कोरिलेला पाहून पोर्तुगीज लोकांनीं ह्या बेटास एलिफंटा हें नांव दिलें. ह्या बेटांत कांहीं कोरीव लेणीं आहेत व ह्यामुळेंच ह्या बेटाची प्रसिद्धि आहे. हीं लेणीं एकंदर पांच असून तीं बेटाच्या पश्चिमेकडील एका टेकडींत कोरिलीं आहेत. त्यांपैकीं एक लेणें व त्याच्या दोन्ही बाजूंस असलेले सिंहाचे दोन मोडके पुतळे चित्रांत दिसत आहेत. हीं लेणीं हिंदूंनीं इ. स. च्या ८ व्या शतकांत बांधिलीं असें ह्मणतात. मुख्य लेण्यांत त्रिमूर्ति, शंकरपार्वतीच्या लग्नसमारंभाचा देखावा, शंकराचें तांडव, अर्धनारी-नटेश्वर, गणपति, शंकराचे गण, द्वारपाल वगैरेंच्या भव्य मूर्ती कोरिलेल्या आहेत. हें कोरीव काम फार सुबक व सुंदर आहे. ह्या सर्वांमध्यें त्रिमूर्तीची भव्य मूर्ति प्राचीन खोदकामाचा एक उत्कृष्ठ नमुना ह्मणून प्रसिद्ध आहे. दरवर्षी महाशिवरात्रीस येथें यात्रा भरते.

# कर्णेश्वराचें देवालय–संगमेश्वर.

रत्नागिरी जिल्ह्यांत शास्त्री नदीच्या कांठीं संगमेश्वर नांवाचें एक बंदर आहे. त्याचे कसबा व पेठ असे दोन भाग आहेत. त्यांपैकीं कसब्यांत कर्णेश्वराचें प्राचीन देवालय आहे. तें चित्रांत दाखविलें आहे. या देवळाची रचना व बांधणी व देवळावरील कोरीव काम हीं प्राचीन शिल्पशास्त्राच्या दृष्टीनें महत्त्वाचीं आहेत. देवालयाचें सर्व बांधकाम दगडी असून मजबूत आहे. देवळाच्या पूर्व, दक्षिण व उत्तर बाजूंस तीन दरवाजे आहेत. देवालय एका उंच दगडी चौथऱ्यावर बांधिलेलें असून देवळांत जाण्याकरितां प्रत्येक दरवाज्यासमोर दगडी पायऱ्या आहेत. देवालयाच्या प्रवेश-द्वारांत चार दगडी खांबांवर उंच कमानी देऊन त्यांवर घुमटाकृति बांधणी केली आहे. दरवाज्यांतून आंत गेल्यावर विस्तृत सभामंडप लागतो व त्याच्या पलीकडे आंतल्या बाजूस गाभारा आहे. तेथें एक शिवलिंग असून त्याच्या वरच्या बाजूस उंच शिखर आहे. तें चित्रांत दिसत आहे. देवालयाच्या आंतील व बाहेरील खांबांवर सुबक कोरीव नक्षीकाम केलेलें असून बाहेरील दगडी भिंतींवर देवादिकांच्या फारच सुंदर मूर्ती कोरिलेल्या आहेत.

हें देवालय इ० स० च्या सातव्या शतकांत चालुक्य वंशांतील कर्ण राजानें बांधिलें असें ह्मणतात. कोल्हा-पूरच्या अंबाबाईच्या देवळाची रचना, बांधणी व तेथील कोरीव काम हीं पुष्कळ अंशीं या कर्णेश्वराच्या देवळा-सारखींच असल्यामुळें हीं दोन्हीं देवळें कदाचित् एकाच वेळीं बांधिलीं असावीं असें दिसतें.



१४३ कर्णेश्वराचें देवालय—संगमेश्वर.



१४४ एल्फिन्स्टन् पॉइंट—महाबळेश्वर.



१४५ आर्थरसीट—महाबळेश्वर.



१४६ पांचगणी येथील देखावा.

# पांचगणी येथील देखावा.

पांचगणी हें प्रसिद्ध हवा खाण्याचें ठिकाण सातारा जिल्ह्यांत वाईच्या पश्चिमेस आठ मैलांवर व महाबळेश्वराच्या पूर्वेस सुमारें बारा मैलांवर आहे. त्याची समुद्रसपाटीपासून उंची सुमारें ४३०० फूट आहे. हें ठिकाण महाबळेश्वरापेक्षां २०० फूट खालीं पूर्व बाजूस असल्यामुळें महाबळेश्वरांतील अतिशय पाऊस व धुकें यांचा त्रास पावसाळ्यांत येथें होत नाहीं. त्याचप्रमाणें एका विस्तीर्ण कडेपठाराच्या (टेबल लँडच्या) खालीं हें पश्चिमेस असल्यामुळें पूर्वेकडील वाराही येथें कमी लागतो. ह्मणून हें ठिकाण बाराही महिने राहण्यास फारच सोईचें आहे. येथील उष्णतामान महाबळेश्वराप्रमाणेंच असून हवा थंड व कोरडी असल्यामुळें हें हवा खाण्याचें एक ठिकाण झालें आहे. ह्मणून दरवर्षी पुष्कळ लोक येथें राहण्यास येतात. त्यांच्या सुखसोयीकरितां येथें रुग्णालयें, विद्यालयें, खेळण्याच्या जागा, वाचनालयें, भोजनगृहें व वसतिस्थानें बांधिलीं आहेत. अलीकडे खाजगी लोकही राहण्याकरितां येथें अनेक बंगले बांधूं लागले आहेत.

सिल्व्हर ओक नांवाच्या झाडांच्या दाट छायेंत बांधिलेल्या कांहीं इमारती चित्रांत दिसत आहेत. टेबल लँड नांवाच्या उंच कडेपठारावर उभें राहून पश्चिमेकडे पाहिलें असतां दिसणारा पांचगणीचा सुंदर देखावा चित्रांत दाखविला आहे. चित्राच्या वरच्या बाजूस दाट झाडींत महाबळेश्वरास जाणारा नागमोडी रस्ता दिसतो. पांचगणीच्या पश्चिम, दक्षिण व उत्तर दिशेस सह्याद्रीच्या रांगा व त्यांवरील उंच शिखरें व पूर्वेस कृष्णा नदीचें खोरें व प्रवाह यांचा रमणीय देखावा दिसतो.

# ड्यूकस् नोज्–खंडाळें

सह्याद्रींत बोरघाटामध्यें खंडाळें हें आगगाडीचें एक स्टेशन आहे. त्याची उंची समुद्रसपाटीपासून १७८७ फूट असल्यामुळें तेथील हवा थंड आहे. येथील भोंवतालचा प्रदेश पूर्णपणें डोंगराळ असल्यामुळें निसर्गशोभेचे सर्व प्रकार येथें नजरेस पडतात. गर्द झाडी असलेल्या खोल दऱ्या, किल्ल्याच्या तटाप्रमाणें उंच असे पर्वताचे तुटलेले कडे, कित्येक ठिकाणीं त्यांवरून उड्या घेणारे जलप्रवाह, डोंगराच्या एकापुढें एक अशा पसरलेल्या रांगा व त्यांचीं उंच गेलेलीं शिखरें, अशा प्रकारचा सुंदर देखावा येथें दिसतो. ह्यामुळें ह्या ठिकाणीं हवापालट करण्याकरितां येणारे लोक भोंवतालच्या दऱ्याखोऱ्यांतून व पर्वतशिखरांवरून हे देखावे पाहाण्यास मुद्दाम जातात. अशा उंच शिखरांपैकींच " ड्यूकस् नोज् " हें एक स्थळ असून तें खंडाळ्याच्या नैर्ऋत्येस अंबारी नांवाच्या डोंगराच्या पलीकडे सुमारें तीन मैलांवर आहे. ड्यूकस् नोज् ह्मणजे ड्यूकचें नाक. चित्रांत डाव्या बाजूस जें उंच टोंक आहे तेंच ड्यूकस् नोज् होय. ड्यूक ऑफ वेलिंग्टन्च्या पुढें आलेल्या नाकासारखाच हुबेहूब या टोंकाचा आकार दिसतो, ह्मणून इंग्रज लोक त्यास 'ड्यूकस् नोज' असें ह्मणतात. खंडाळ्याजवळील खोपोली येथून ह्या टोंकाकडे पाहिलें असतां त्याचा आकार सापाच्या उभारलेल्या फणेसारखा दिसतो, ह्मणून त्यास तेथील लोक " नागफणी " असेंही ह्मणतात.



१४८ लोनावळें येथील देखावा.

# लोनावळें येथील देखावा.

लोनावळें हें आगगाडीचें स्टेशन बोरघाटाच्या माथ्यावर असल्यामुळें तेथील हवा उन्हाळ्यांत थंड असते व त्यामुळें श्रीमंत लोक तेथें मुद्दाम राहाण्यास जातात. शिवाय, टाटा हायड्रोइलेक्ट्रिक कंपनीचे तीन मोठे तलाव तेथें नजीकच बांधिलेले असल्यामुळें ह्या ठिकाणाला अलीकडे बरेंच महत्त्व आलें आहे. भोंवतालचा प्रदेश डोंगर, दऱ्या व झाडी यांनीं व्याप्त असल्यामुळें निसर्गशोभेचेही अनेक प्रकार येथें पहावयास मिळतात. चित्रांत अशा प्रकारचा एक देखावा दाखविला आहे. अगदीं मागच्या बाजूस एक पर्वताची रांग चित्रांत अस्पष्ट दिसत असून तिच्या पुढें झाडीनें आच्छादित अशा अनेक लहान टेकड्या आहेत. तेथून एक जलप्रवाह समोर वाहात येत आहे असें दिसतें. डोंगराच्या उतरत्या बाजूवर असलेल्या दाट झाडींत श्रीमंत लोकांचे लहान टुमदार बंगलेही मधूनमधून दिसतात. या स्थळाची उंची, डोंगराची शोभा, गर्द झाडी व उत्तम हवापाणी या कारणांनीं लोनावळें हें एक हवा खाण्याचें ठिकाण झालें आहे व त्याची महाराष्ट्रांत बरीच प्रसिद्धि आहे.

# पॅनोरामा पॉइन्ट्–माथेरान.

माथेरान हें थंड हवेचें प्रसिद्ध ठिकाण कुलाबा जिल्ह्यांत समुद्रसपाटीपासून २६७८ फूट उंचीवर आहे. जी० आय्० पी० रेल्वेच्या मुंबई–पुणें रस्त्यावरील नेरळ स्टेशनापासून हल्लीं तेथें जाण्यास १२ मैल लांबीचा आगगाडीचा अरुंद रस्ता केला आहे. हा रस्ता माथेरानच्या डोंगराला ठिकठिकाणीं वळसे घेत घेत थेट शिखरावर जातो. महाबळेश्वराप्रमाणेंच माथेरानच्या डोंगरावरही निसर्गशोभा पाहण्याचीं निरनिराळीं स्थानें ह्मणजे पॉइन्ट्स् पुष्कळ आहेत. त्यांपैकीं सर्वांत प्रसिद्ध अशा पॅनोरामा पॉन्ट्चा दुरून दिसणारा देखावा चित्रांत दाखविला आहे. चित्रांत अगदीं उजवीकडे पॅनोरामा पॉइन्ट् दिसत असून त्याच्यासमोर व खालीं उंच पर्वतशिखरें व वृक्षाच्छादित खोल दऱ्या आहेत. माथेरानच्या डोंगरावर वळणें घेतघेत जाणाऱ्या आगगाडीच्या रस्त्याचा थोडासा भागही चित्रांत उजव्या बाजूस पॅनोरामा पॉइन्ट्च्या खालीं दिसत आहे. पॅनोरामा पॉइन्ट्चें मूळचें नांव "गडाची सोंड" असें आहे. ह्या पॉइन्ट्वरून पूर्व, उत्तर व पश्चिम ह्या दिशांकडे नजर फेंकिली असतां फारच दूरच्या प्रदेशाचा सुंदर देखावा दिसतो. पूर्वेस उंच शिखरें असलेली दूर पसरलेली सह्याद्रीची रांग, उत्तरेस बावा मलंग नांवाच्या डोंगराची ओळ, पश्चिमेस साष्टी बेट, त्यांतील खाडया व मुंबई बंदर, अशा प्रकारचा तीन बाजूंस पसरलेला दूरचा रमणीय देखावा येथून दिसतो, ह्मणूनच यास पॅनोरामा पॉइन्ट् असें ह्मणतात. माथेरान येथील सर्व स्थळांत याचें महत्व विशेष असल्यामुळें सृष्टिशोभा पाहण्याकरितां जाणाऱ्या लोकांची या ठिकाणीं बरीच गर्दी असते.



१४९ पॅनोरामा पॉइंट—माथेरान.







# १५० महाराष्ट्र व मुंबई इलाखा.